# जीवन-स्वर

(कथा-संग्रह)



लेखक

यशवन्त गणेश वझे

बी.ए., एल्एल्.बी.

प्रस्तावनालेखक

के. नारायण काळे

बी.ए. (ऑनर्स), एल्एल्.बी.



किंमत सव्वा रुपया     सप्टेंबर १९३९

दिवंगत

**विनायक**

याच्या स्मृतीस

# निवेदन

---

'जीवनस्वर' वाचकाच्यापुढें ठेवण्यात त्याचें बरें वाईट काहीं सुद्धा करण्याचा माझा मुळीच हेतु नाहीं एवढें प्रारभींच सागून टाकलें म्हणजे माझ्या भूमिकेबद्दल कुणाचाही फारसा गैरसमज होण्याचे कारण नाहीं. अधिकारवाणीनें बोलण्याची अथवा लिहिण्याची माझी पात्रता नाही, जगाचा अनुभवही फारसा नाहीं, वाङ्मयव्यासंग तर अगदींच अल्प, अशा परिस्थितींत उपदेशकाची भूमिका घेण्याचा मीं अभिनिवेश केला तरी त्यानें फसून जाण्या-इतका वाचकवर्ग अप्रबुद्ध राहिलेला नाहीं.

लेखनकला ही इतर कलाच्या प्रमाणेच एक असल्याकारणानें त्या कलेच्या मागेही एका विशिष्ट प्रकारची मनोवृत्ति लागते... वगैरे गोष्टी मला अमान्य नाहीत. पण ह्या गोष्टीसुद्धा हेतुकथनात तरी वाचकाच्या गळीं उतरविण्याचें कारण नाहीं हेंहि तितकेच खरे आहे. वाचकवर्ग आता लेखकाच्याकडे फक्त कौतुकानेंच पाहू लागण्याइतका व्यवहारी बनला आहे.

लिहिलें का, छापलें का व प्रसिद्ध का केलें याबद्दल कुणालाच जिज्ञासा नसते. छापलेच आहे तेव्हा वाचून पहायला हरकत नाहीं असाच उदार दृष्टिकोन ललितवाङ्मयाच्या बाबतींत वाचकवर्ग ठेवू लागला आहे. तेव्हा माझ्या लेखनाच्या मागे मोठीं सामाजिक, कलात्मक, नैतिक वगैरे तत्त्वे उभीं असून स्फूर्ति स्वस्थ बसू देईना

. लिहिणे भागच होतें, वगैरे गोष्टी मी बरळू लागलो तर एखादा वाचक म्हणायचा 'अहो, गप्प बसायला काय घ्याल? तुमच लिखाण वाचण्याचा प्रसग आमच्यावर ओढवलाच आहे तेवढा सूड पुरे आहे की!'

तेव्हा अगदी सागितल्याच पाहिजेत अशा ज्या तत्त्वविहीन चार दोन गोष्टी आहेत तेवढ्याचाच थोडक्यात उल्लेख करून मी स्वस्थ बसणार आहें.

लहानपणीं माझी अशी प्रामाणिक समजूत होती की कोरे कागद पुडया बाधण्यासाठीं वापरू नयेत अशी धर्माज्ञा असावी म्हणून ते छापखान्यात चिताडून वाण्याकडे रद्दीच्या स्वरूपात पाठविले जातात—पुडे बाधायला लहान पडतात त्याची पुस्तके करतात हा उपसिद्धान्त. पण केव्हा तरी चित्रकलेनें माझ्यावर आपला पगडा बसविला आणि चित्राची पुस्तके मला आवडू लागली. मग मात्र माझे मत बदलून मला ह्या व्यवहाराचे सत्यदर्शन झाले

स्थिर, पार्थिव सौदर्य शब्दात वर्णिता येते. पण त्याहीपेक्षा तें चित्रकलेचा खरा विषय आहे असें मला वाटते. आणि ह्या प्रवृत्ती-मुळेच माझ्या लेखनातील पात्राची शारीरिक वर्णनें देण्याच्या भानगडीत मी फारसा पडत नाही. तीं पात्रे एकमेकाना कशी वाटतात हेच मी जास्त पहातो. नाहीं तरी ती पात्रे प्रत्यक्ष पाहून वर्णनाचें यश कुठे अजमावून पहाता येणार आहे? मनाचे सौदर्य व दृष्टीला न दिसणारे मनोव्यापार ह्याच गोष्टी वाचकाना पटतील अशा शब्दात— त्याच्याच नेहमींच्या भाषेत त्याच्या पुढें ठेवण्याचा प्रयत्न करणें अधिक इष्ट अशी माझी समजूत आहे. त्या प्रयत्नात मला कितीसे यश आले आहे किंवा येईल हा प्रश्न वेगळा.

मनुष्यप्राणीच जिथे पूर्णावस्थेला पोंचलेला नाहीं, तिथे आपण कल्पनेनें निर्माण केलेलीं पात्रे सर्वस्वीं दोषरहित असलींच पाहिजेत असा हट्ट लेखकानें धरणे योग्य होणार नाहीं. स्वभाव-परिपोष म्हणजे काहीं अगदी निर्दोष व्यक्तीची निर्मिति नव्हे. सामान्यामध्यें सरस पण मानवी जीवितावरच आधारलेल्या मनोवृत्तींची चालतीं-बोलती माणसे वाचकाच्यापुढें ठेवली तरच तीं सभाव्य व म्हणून मान्य होतील अशी माझी तरी समजूत आहे. माझ्या गोष्टीतील पात्राच्यामध्यें स्वाभाविक दोष म्हणून जे काही प्रामाणिक वाचकाला आढळतील ते मी मुकाट्यानें स्वीकारायला तयार आहे.

ह्या पुस्तकात एकदर सात गोष्टी दिल्या आहेत पण त्या लघुकथा म्हणून लिहिल्या नसून मला जे काही सागावयाचे होतें तें सागून सपेपर्यंत मी लिहीत गेलो आहे ही खरी हकिगत. अर्थात् तत्र-दृष्टया बराच मतभेद होण्याचा सभव आहे. पण गोष्टीचे विषय इतके भिन्न भिन्न आहेत की लिखाणावरून लेखकाबद्दल कल्पना-चित्रे रगविण्याच्या मोहापासून वाचकवर्ग साहजिकपणेच परावृत्त होईल.

माझे स्नेही रा. यशवन्त गोपाळ जोशी याच्यासारखे प्रकाशक लाभणें, आणि ज्याच्याकडे मी थोडया ध्येयात्मक दृष्टीने पाहतों असे माझे फार जुने मित्र श्री. के. नारायण काळे यानी माझ्या पहिल्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिणे, या दोन गोष्टी मला वडीलधाऱ्या माणसाच्या अशीर्वादासारख्याच वाटत आहेत.

कुशल फोटोग्राफर म्हणून विख्यात असलेले माझे स्नेही श्री. वा. ना. भट यानी पुस्तकाच्या बहिरगाची सजावट करण्यात मला अमोलिक मदत केली आहे तिचा साभार उल्लेख करणें

अवश्य आहे. त्यानीं आपुलकीनें दिलेले छायाचित्र त्याच्या कले बद्दल कुणाचीही खात्री करीलच. व्यक्तिशः मला तें चित्र इतके पसत पडले कीं स्वतःच चित्र तयार करण्याचा विचार मी ताबड-तोब सोडून दिला.

माझा संकल्प प्रत्यक्षात आणण्याच्या कामी ज्यानी ज्यानी मला मदत केली आहे अथवा प्रोत्साहन दिले आहे त्या सर्वाचा मी अत्यत ऋणी आहे.

२५ सेप्टेंबर १९३९<br>पुणे २

यशवन्त गणेश वझे

# प्रस्तावना



गोष्टी ऐकणे, हा करमणुकीचा सनातन आणि सर्वसामान्य प्रकार आहे. गोष्टी सांगण्याची कला, ही जगातली जुन्यात जुनी आणि विस्तार पावत पावत आजतागायत टिकून राहिलेली सार्वजनिक कला आहे, याबद्दल दुमत असण्याचे कारण नाहीं. मनोरंजनाच्या हेतूने लिहिलेले सारेच वाङ्मय कथाप्रधान असते. काव्य असो, कादंबरी असो वा नाटक असो, गोष्ट सांगणे हाच त्यातील प्रधान हेतु असतो, कोणत्याही वाङ्मय प्रकारातून त्याचे तांत्रिक वैशिष्ट्य बाद केले, कीं ऐन-जिनसी गोष्टच खाली राहते, आणि तोच त्या कृतीचा खरा सत्त्वांश असतो. लघुकथा हे गोष्ट सांगण्याच्या कलेचें आधुनिक व परिणत स्वरूप होय. आजच्या भौतिक परिस्थितीचे यथार्थ स्वरूप या नवोदित वाङ्मयप्रकारात प्रतिबिंबित झालेलें आढळते. लघुकथेचा आटोपशीरपणा, तिचा सुटसुटीत एकजिनसी-पणा, विषयाच्या निवडीच्या बाबतीत तींमध्यें सहज मिळणारी ऐसपैस मोकळीक, यामुळे वर्तमान युगाचा प्रातिनिधिक वाङ्मय-प्रकार म्हणून लघुकथेकडे बोट दाखविता येतें. नाटक, कादंबरी यासारख्या प्रदीर्घ प्रबंधामध्यें अनेक प्रसंगांची व घटनांची, एक-जीव जुळणी करून कथानकाची वीण विणावी लागते, यामुळें सुसंघटित रचनेचे कांहीतरी निर्बंध, कांहींतरी नियम, कांहींतरी संकेत उत्पन्न होणे व ते पाळले जाणे आवश्यकच होऊन बसते.

वेगवेगळया आकाराची, निरनिराळ्या रगाची अनेक रत्नें एकत्र आणून ती परस्पराना मारक न ठरता वेगवेगळेपणाने उठावदार दिसतील आणि एकदरीत साऱ्या साजालाही सामर्थ्याने शोभा देतील, अशा प्रकारे त्याची एकसूत्री जडण-घडण, कादबरी किंवा नाटक यामध्ये करावी लागते पण लघुकथेचे तसे नाही. लघुकथा-लेखकाला सभोवार विखुरलेल्या अनेक घटनातून, अलग काढून पुढे ठेवताच वाचकाला आकर्षक वाटतील अशा घटना अचूक निवडण्याची हातोटी असली आणि त्या खुलवून दाखवण्यासाठीं वाचकाना सहजासहजी समजतील अशा साच्यात, सुबोध, सुटसुटीत सार्थ आणि सरस शब्दाचा उपयोग करण्याचे कसब असले म्हणजे झालें रचनात्मक चातुर्याची त्याला फारशी आवश्यकता नाही. जीवनाच्या खाणीतून विशिष्ट घटनेचा एखादा खडा वेचून, त्याच्या-वर त्याने आपल्या अनुभवाची, निरीक्षणाची थोडीशी झिलाई दिली, तर्कबुद्धीच्या मसाल्यान थोडीशी घासपूस केली आणि साजेशा शब्दाच्या कोंदणात जडवन तो लोकापुढे माडला, म्हणजे लघुकथा-लेखकाचें काम झाले

लघुकथा हा अशा रीतीने स्फुट स्वरूपाचा वाङ्मय प्रकार असल्यामुळे, नाटक किंवा कादबरी यामधील विषयाना ज्या प्रकारची विशेष व्याप्ति, भव्यता किंवा खोली अपेक्षित असते, तशा प्रकारची व्यापकता, भव्यता किंवा सखोलता लघुकथेत अपेक्षित असण्याचें कारण नाहीं. वाचकाच्या मनावर होणाऱ्या परिणामाच्या गाढपणापेक्षा, त्याच्या मनाचें रजन करणे आणि त्याना त्याच्या काहीं अनुभवाचा थोडक्यात आणि चटकदारपणे पुनःप्रत्यय आणून देणें, एवढेंच लघुकथालेखकाचें साध्य असते. यामुळे

मानवी जीवनातील कोणतीही वैशिष्ट्यपूर्ण घटना, अनुभव, चमत्कृति किंवा कल्पना लघुकथेचा विषय होऊ शकते. स्वाभाविकच लेखकाच्या अनुभवाची विविधता, त्याच्या निरीक्षणाची सूक्ष्मता आणि वाचकाच्या मनाला पुनःप्रत्यय प्राप्त करून देण्याचे त्याचे लेखन-कौशल्य ही लघुकथा-लेखनाची महत्त्वाची अवश्यक अंगे ठरतात.

या दृष्टीनें पाहता जीवनातील विविध व्यापाराचा ज्याना अनुभव मिळालेला असेल, वेगवेगळ्या व्यवसायात, वेगवेगळ्या वाता वरणात ज्यानी दिवस काढले असतील, त्याना लघुकथालखनाला पुष्कळशी सामग्री मिळणे स्वाभाविक आहे. नाटक, कादंबरीसारख्या स्थापत्य-प्रधान वाङ्मयप्रकाराच्या सघटित स्वरूपात जडू न शकणाऱ्या अशा कितीतरी किरकोळ, त्रुटित, फुटकळ स्वरूपाच्या, पण वैशिष्ट्यपूर्ण अशा तपशीलाच्या 'वस्तु', लघुकथारूपानें वाचकापुढें कलात्मक रीतीनें माडण्यास अवसर असतो. दृष्टिकोणात वैशिष्ट्य आणि 'वस्तू'त वैचित्र्य असले, म्हणजे वाटेल त्या सामग्रीतून कुशल लेखकाला लघुकथा निर्माण करता येणे शक्य आहे.

प्रस्तुत कथा-सग्रहाचे लेखक श्री. वझे याच्याशी माझा जो आज उणापुरा पधरा वर्षाचा परिचय आहे, त्यावरून त्याना लघुकथालेखकाला आवश्यक असलेल्या गोष्टी निखालस अनुकूल आहेत, असे मी म्हणू शकतों. विश्वविद्यालयाचे तत्त्वज्ञानाचे आणि कायद्याचे पदवीधर असताही, चरितार्थासाठीं चित्रकाराचा व नेपथ्यरचनाकाराचा व्यवसाय त्यानी केलेला आहे व प्रवाहपतित पद्धतीनें पत्करलेला वकिलीचा चालता पेशा सोडन, मुद्रणव्यवसाय स्वीकारलेला आहे. स्वतःच्या स्वभाव विशिष्ट कारणामुळे उत्पन्न

झालेल्या परिस्थितीप्रमाणेच आकस्मिक ओढवलेल्या अनेक कठोर दैवी आपत्तींनाही त्यानी आपल्या या लहानशा वयात अनेक वार धैर्यानें तोड दिलेले आहे. सदा आनदित आणि हसतमुख दिसणाऱ्या, आणि वर वर पाहणाऱ्याला काहीशा उथळ, भोळसर, गडबड्या आणि अव्यवस्थित आशावादी वाटणाऱ्या, या तरुणाच्या आयुष्यात अनेक विविध, सखोल, व्यापक अनुभवाची साठवण झालेली असेल, असे त्याच्याशीं निकट परिचित नसलेल्या क्वचितच कोणाला वाटेल, परतु या सग्रहातील कथा वाचणाऱ्याला मात्र त्याची चुणुक दिसल्या-वाचून राहणार नाही. त्याच्या अनुभवातील खरीखुरी उत्कटता आणि विविधता सारीच्या सारी या सग्रहात प्रकट झालेली नसली, तरी विशेष अशी काही अपेक्षा लेखकाबद्दल निर्माण करण्याइतके तिचे प्रदर्शन त्यात नि:सशय झाले आहे.

श्री वझे याची लेखन-शैली सुबोध, ओघवती आणि सरस आहे, याची साक्ष या सग्रहातील त्याची कोणतीही गोष्ट देईल. पण जीवनातील उत्कट अनुभवाचा इतका निकट परिचय असलेल्या लेखकाने, आपल्या कलेचा उपयोग सामान्य वर्तमानपत्री विषयाना लघुकथाचे रूप देण्यात करण्याऐवजी, आपल्या अनुभवाच्या सामग्रीतून जिव्हाळ्याच्या विषयाची निवड करून त्याची माडणी करण्यात केला, तर अधिक बरे होईल असे वाटल्यावाचून राहत नाही. आजकालच्या मराठी लेखकात कलावान लेखकाची तूट नाही, सत्यवान लेखकाची आहे, आणि ही उणीव जर भरून यावयाची असेल, तर श्री. वझे याच्यासारख्या विविध अनुभवाचे जीवन जगलेल्या लेखकानी कलेच्या, सौंदर्याच्या, लालित्याच्या गतानुगतिक कल्पनात गुतून न राहता, कॉलेजच्या विश्वातून आणि

आशिक-माशुकांच्या उथळ, अननुभवी शब्दजंजाळातून बाहेर पडून, प्रपंचातील खऱ्याखुऱ्या अनुभवांना कथावस्तूचें स्वरूप देणें आवश्यक आहे. श्री. वझे यांच्या या संग्रहातील कथांतून प्रकट झालेली त्यांची तंत्रविषयक व भाषाविषयक तयारी पाहिली म्हणजे अशा प्रकारची अपेक्षा त्यांच्याकडून करायला काहीच हरकत दिसत नाहीं. "जीवन-स्वर" ही या संग्रहातील गोष्ट, इतकीं ठसठशीत शब्द-चित्रें वाचकाच्या डोळ्यापुढे उभी करते, की त्या कथेतील पात्रे प्रत्यक्षपणे आपल्या नजरेपुढे वावरत असून, जणू काही त्यांच्या हालचाली चित्रपटातील एखाद्या प्रसंगाप्रमाणे आपण पडद्यावर पाहत आहोत, असे वाटल्यावाचून राहत नाही. लेखन शैलीतला हा जिवंतपणा जर अधिक जिव्हाळयाच्या अनुभवाच्या कथा रेखाटण्यात वापरण्यात आला असता, तर त्यांची परिणामकारकता याहूनही जास्त वाढली असती यात संशय नाही. "जीवन-स्वर" या गोष्टीप्रमाणेच या संग्रहातील 'अभिमान', 'नवी दृष्टि', 'दुर्दैवी दैवत' याही गोष्टी स्मरणात राहण्यासारख्याच आहेत.

परंतु लेखक व वाचक यांच्यामध्ये, लेखकाच्या सृष्टीतील विशिष्ट व्यक्तींच्या व घटनांच्या पर्यवसानाबद्दल व परिपोषाबद्दल, तर्कशुद्धता व सुसंगतता याबाबत, अनेक वेळा मतभेद होण्याचा संभव असतो. लेखक व वाचक यामध्ये हे मतभेदाचे प्रसंग ज्या मानानें कमी, त्या मानाने तो लेखक अधिक वास्तववादी, असे म्हणावयास हरकत नाही. वाचकांनी किंवा टीकाकारांनी अमुक पर्यवसान किंवा परिपोष तर्कदुष्ट किंवा असंबद्ध आहे असे म्हटलें, कीं सामान्य लेखक ती विशिष्ट घटना आपण प्रत्यक्ष वस्तुस्थितींतून उचलली असल्याचे प्रमाण बहुशः पुढे करीत असल्याचे आढळते, आणि शेकडा नव्वद वेळा

त्याचें तें म्हणणें खरेंही असते. परतु याचा अर्थ टीकाकाराचा व वाचकाचा तो आक्षेप निराधार असतो, असा करणे मात्र बरोबर होणार नाहीं. विवक्षित पर्यवसान किंवा परिपोष वस्तुस्थितीत शक्य आहे, एवढें बचावाचे प्रमाण पुरेसे नसून गृहीत परिस्थितीत तो सभवनीय आहे, किंबहुना अनिर्वाह्य आहे, हें लेखकाला आपल्या लिखाणातून वाचकाना सहज प्रतीत करता आलें पाहिजे. व्यवहार आणि वाङ्मय-कृति यात मोठा फरक हा आहे, कीं वाङ्मय कृति हा जीवनातील एखाद्या अखड, विस्तृत परिसराचा, विशिष्ट वाङ्मय-प्रकाररूपी चौकटींत बसवलेला एक लहानसा अलग तुकडा असतो, आणि हा तुकडा तोडून घेताना लेखक जीवनात अस्तित्वात असलेला सारा तपशील, त्याच्याशीं सबध असलेल्या सान्या घटना, सान्या व्यक्ति, त्याच्यामधील परस्पर-सबध व कार्यकारणभाव, सारेच्या सारे, जसेच्या तसेच, उचलून घेत नाही. स्वतःची विवेकबुद्धि चालवून त्यातील आवश्यक वाटतील तेवढ्याचीच तो निवड व पुनर्रचना करीत असतो. स्वाभाविकच त्याची तपशीलाची निवड व रचना आणि वास्तविक जीवनातील त्याचे मूळ स्वरूपातील सबध, याच्या सकलित परिणामात फरक पडणे अगदीं शक्य असतें. यामुळे, फौजदारी गुन्हा सिद्ध करण्यासाठी पुरेसा पुरावा पुढें आणणे जसें आवश्यक असतें व तो सादर करण्याची जबाबदारी ज्याप्रमाणें फिर्यादी पक्षावर असते, त्याप्रमाणें विशिष्ट परिणतीची वास्तविकता सिद्ध करण्याची आणि त्यासाठीं पुरेसा पुरावा, वाचकाची बिनबोभाट खातरजमा होण्याइतका पुरावा, देण्याची जबाबदारी लेखकावर राहते. ही जबाबदारी पार पाडण्यात ढिलाई झाली, कीं शपथेवर सागितलेली सत्यकथाही वाङ्मयदृष्ट्या अवास्तविक ठरणे

अगदी सभवनीय आहे. श्री वझे याची लेखनपद्धति या दृष्टीनें क्वचित् आक्षेपार्ह वाटण्याची शक्यता असल्यामुळे, त्यानी याबाबत जरा जास्त लक्ष पुरवणे अवश्यक आहे, अशी सूचना करणें जरूर आहे.

कोणत्याही व्यवसायात वाकबगारी सपादन करावयाची म्हणजे काही ना काही काळ तरी त्यात उमेदवारी करावी लागते, याचा श्री. वझे याना अनुभव आहेच. 'जीवन स्वर' हा त्याचा कथासग्रह, म्हणजे त्याची वाङ्मयव्यवसायातील उमेदवारीच होय. ज्या सफल उमेदीनें त्यानी आपली ही प्राथमिक कामगिरी बजावली आहे तिचे स्वरूप पाहता आजचा मराठी रसिकवर्ग त्याच्या परिश्रमाचे चीज आणि कौतुक केल्यावाचून राहणार नाही आणि श्री. वझे हेही याच दृष्टीनें रसिकाच्या परामर्शाचा आदर करतील अशी खात्री वाटते.

२० सप्टेंबर १९३९
पुणे ४

के. नारायण काळे

# अनुक्रमणिका







# १ जीवन-स्वर

कुणी म्हणतात कीं, संगीत हें मदिरेइतकेंच मादक असतें. तर कुणी म्हणतात कीं, संगीत ही दुःखी जीवाला आपली विपत्ती थोडा वेळ तरी विसरावयाला लावून, हृदयाला विश्रांति देणारी दिव्य औषधी आहे. उलट कुणी कुणी असेही म्हणतात कीं, संगीताची आसक्ति संगीताच्या भक्ताला माणुसकीसुद्धा विसरायला लावते !

पहाणाराला कुठल्याही गोष्टींत जें पहावें तें दिसतें व जसें पहावे तसे दिसतें, म्हणूनच प्रत्येक गोष्टीला अनेक स्वरूपें प्राप्त होतात.

इन्दु आणि चन्द्रकान्त संगीताचा आनंद मनसोक्त उपभोगीत होतीं संगीताच्या लहरींबरोबर सहजच दोघांचींहीं हृदयेंसुद्धा तालें-तद्रींत आन्दोलनें घेत होतीं. संगीताच्या नाजुक निनादांनी त्या खोलींतील सारें वातावरणच डुलत होतें.

संगीताच्या अभ्यासापुरतें त्याचें 'गुरुशिष्ये'चें नातें होतें. पण त्या व्यतिरिक्त स्नेहभावाच्या बंधनानीं त्यांची मनें एकमेकास बांधिली गेलीं होतीं.

तरुणपणींची मनोवृत्ती निसर्गतःच अशी असते, कीं त्या वयात स्त्री पुरुषाचा, अथवा तरुण–तरुणींचा परिचय होताच त्याचें रूपांतर स्नेहात व केव्हां केव्हां प्रेमात अल्पावधींतच होऊन जाते. मात्र तो स्नेह टिकविण्याला किंवा प्रेमाला मूर्त–स्वरूप येण्याला समान मनोवृत्तीची आवश्यकता असते. तिच्या अभावीं सर्व गोष्टी क्षणभंगुर होतात.

आणि मनोवृत्तीची समता नसता, आकस्मिक रीतीनें घडून आलेल्या स्नेहावर आशेची उभारणी करून भलत्याच अपेक्षा करू लागल्यास त्याचें पर्यवसान अप्रिय परिस्थितींत झाल्याशिवाय रहात नाहीं. कच्च्या पायावर केवढीही मोठी इमारत उभारली तरी ती लवकरच कोसळल्याविना कशी रहाणार !

आज चंद्रकान्त नवीनच राग शिकवणार होता. पण नेहमींच्या रिवाजाला अनुसरून आदल्या दिवशींच शिकविलेल्या एका चिजेची उठावणी तो इन्दूकडून म्हणून घेत होता. तो पेटीनें तिला साथ देत होता आणि ती तंबोरा छेडून गात होती. गाणें संपताच तिनें तंबोरा बाजूला ठेवून दिला.

"आज नाहीं ना चुकलें ?" हातरुमालानें कपाळावरचे घर्म-बिंदु पुशीत तिनें हसतच विचारलें.

"नाहीं !" तो म्हणाला, "पण मेहेनत केली पाहिजे, बर का. त्याशिवाय आत्मविश्वास नाहीं येणार आणि चटकन् विसरायला सुद्धा होईल."

“एकटीनच प्रॅक्टिस करायची म्हणजे वेसूर होईल कीं काय अशी भीती वाटते.”

“पण पेटी आहे ना ? अन् तबोरा काहीं चुकत नाहीं.”

“तें काहीं असल तरी मला विश्वास नाहीं वाटत.” ती हसतच उत्तरली.

“कसला ? अन् कुणाचा ?”

“माझाच विश्वास नाहीं वाटत. मला आपल वाटत कीं, तुम्ही नसला तर बेसूर होईल कदाचित्.”

“जन्मभर दुसऱ्याच्या ओंजळीनच का पाणी पिणार ?” चद्र-कान्तानें विनोदानेंच विचारलें.

“मग त्यात कुठे चुकल ? आमचा स्त्रियाचा जन्मच आहे परावलबी !” तिनेहि हसत उत्तर दिले.

“एवढ्यातच जाणीव झाली वाटत आपल्या अबलापणाची ? अखेर जातीवर जायच्याच तुम्ही.” त्यानें टोमणा मारला.

“अलबत् ! पुरुषही जातीवर जाऊन लागतात शिरजोरपणा करायला वाटेल त्या ठिकाणीं.” तिनें उलट मारा केला.

“अलबत् !” नसलेल्या मिशावर हात फिरवीत तो छाती पुढे काढून म्हणाला.

तिला त्याचें हसू आलें.

“हसतेस का ?”

“उगाचच.” ती हसें दाबून टाकू लागली.

त्यानेंही विषय बदलायचा प्रयत्न केला.

“लक्ष देऊन ऐक, बर का !” तो उसन्या गाभीर्यानें म्हणाला. त्यानें पेटीवर एका रागाची छटा वाजवायला आरभ केला. फिरून

ती खोली मधुर स्वरानी भरून गेली. इन्दु लक्षपूर्वक ऐकू लागली व थोड्याच वेळात ते स्वर तिच्या कानात घुमू लागले. तिच्या मनाला त्या रागाची माधुरी पटली. त्या स्वराशीं समरस होऊन ती डोलू लागली.

छाया संपवून त्यानें त्याच रागातील एक पद वाजवावयाला आरभ केला व त्याबरोबर त्या रागाशी तिचा अधिकाधिक परिचय होऊ लागला.

तो राग तिला नवाच होता. पण त्याच्या पेटीच्या साथीनें ती सहजच आपल्याशीं गुणगुणू लागली.

त्यानें हसूनच दर्शविले—"बरोबर ओळखलस."

आणि ती मोठ्यानें गाऊ लागली—

"मम आत्मा गमलाऽ"

हीच त्याच्या शिकविण्याची जादू होती नुसती रुक्ष सुरावट घोकण्यासाठी त्यानें तिचा कधींच पिच्छा पुरविला नाहीं. परिचयाच्या एखाद्या गाण्यानें नव्या रागाची अप्रत्यक्ष ओळख करून द्यायची आणि मग सहजासहजीं स्वरातील वर्ज्यावर्ज्य, माधुर्याचीं स्थाने, ढग इत्यादीची माहिती द्यायची अशी त्याची पद्धत होती. या पद्धतीमुळें, सगीताची आवड असणाऱ्या बऱ्याच लोकाना सुरावट घोकण्याने येणारा कटाळा इन्दूच्या अनुभवाला कधींच आला नाहीं.

"नाव काय या रागाच ?" तिनें विचारलें.

"बिहाग." तो उत्तरला.

जवळ जवळ अर्धा तासपर्यंत त्यानें त्या रागाची सुरावट व इतर माहिती सहजासहजीं करून दिली.

घड्याळात साडे सहाचा ठोका पडला.

"फिरायला येता ना ?"

"चल की." तो उत्तरला.

शिकवणी झाल्यानतर नेहमींच तीं नदीकिनाऱ्यावर फिरावयाला जात. जवळच पलिकडे नदीसमुद्राचा सगम होता व तो रम्य देखावा त्या दोघानाही फार आवडत असे. किनाऱ्यावरील शुभ्र रेतीवर बसून ती गष्पागोष्टींत वेळ घालवीत व सूर्यास्त झाल्यानतर घरी परत येत असत.

थोडयाच वेळात तीं किनाऱ्यावर पोचलीं. समुद्रावरून शीतल असा वारा सथपणें वहात होता, व त्या वाऱ्यानें इन्दूच्या निळया पातळाचा पदर फडफडत होता. निळें पातळ तिच्या श्वेत कातीला फारच खुलून दिसत असे. त्याच निळया पातळाशी खुलून दिसणारा असा पातळसा ब्लाऊझ तिने चढविला होता आपल्या लाबलचक काळयाभोर केसाची वेणी तिने पाठीवर सोडिली होती, आणि तिच्या कपाळावरचे कुरळे 'कवी' वाऱ्याशीं हास्य-विनोद करीत होते. चद्र-कान्ताच्या सौन्दर्यप्रेमी दृष्टीला ती फारच मोहक दिसत होती.

स्वच्छ शुभ्र वाळूवर दोघेंही समोरासमोर योग्य अशा अंतरावर बसलीं व इकडच्या तिकडच्या गप्पा सुरू झाल्या.

सगीतादि साऱ्या ललितकला पुष्कळ वेळा एकाच व्यक्तीवर प्रेमाचा वरदहस्त ठेवीत असतात असा अनुभव येतो.

वास्तविक पहाता याचें कारण म्हणजे या साऱ्याच्या मुळाशीं एकाच प्रकारची भावनामय, कल्पनापूर्ण व प्रतिकृति-प्रिय अशी मनोवृत्ती असते. सगीताचा भक्त विश्वातील नादब्रह्माचा उपासक असतो, चित्रकार सत्यसृष्टीचा आभास आपल्या कृतींत उतरवि-

ण्याचा प्रयत्न करीत असतो, वाङ्मयोपासक शब्दाच्या जादूनें प्रतिसृष्टीच निर्माण करीत असतो. प्रत्येक ललितकलेचें कार्य क्षेत्र जरी निराळें असले तरी तिच्या मुळाशीं भावना व कल्पना याच दोन गोष्टी असतात, आणि म्हणूनच पुष्कळ वेळा ज्या मनुष्याच्या अंगीं यापैकी एखादी कला प्रामुख्याने वास करीत असते त्याच मनुष्यावर इतरही ललितकलाची थोडीबहुत कृपादृष्टी असते

इन्दु आणि चद्रकात याच्यामध्यें विचार-समता असल्यामुळे त्याना एकमेकाशीं बोलताना विषयाची उणीव पडत नसे.

बोलता बोलता इन्दु मध्येच थाबली. वाळू बाजूला सारून तिच्याखालील स्वच्छ व ओलसर जमिनीवर तो एका काडीने कसली तरी आकृति काढीत होता, त्याकडे तिचें लक्ष गेलें.

"काय चाललय् ?" तिनें चटकन् विचारलें.

"ह !" आणखी रेषा काढीत तो बेफिकीरपणें उद्गारला.

"ह, काय ! मी गोष्ट नाहीं सागत ! लक्ष कुठ आहे तुमच ?"

"अस्स होय ?" चित्रसमाधींतून जागृत होऊन तो म्हणाला आणि आकृति पुसून टाकू लागला.

"पुसून नका टाकू ! मला पाहू द्या." चटकन् उठून इन्दु तें चित्र पाहूं लागली.

रागाचा लटकाच आविर्भाव करून ती म्हणाली, "कित्तीदा सागितल तुम्हाला ? रोज रोज काय माझ स्केच काढता ? मला नाहीं आवडत !"

"तुझ स्केच म्हणून कुणी सागितल ?"

"ज्याअर्थी पाठीवर शेपटा आहे त्याअर्थी माझच स्केच आहे तें."

"मुळींच नाहीं ! अन् असल म्हणून काय झाल ?"

"माझ्या परावानगीशिवाय ?" ती सपशेल खोटें भाडण उकरून काढीत होती,

"अलबत्!" त्यानेंही तिला खोटाच सामना देण्याची तयारी केली. "हें पहा, इन्दु ! A thing of beauty is joy for ever समजलीस ? मी सौदर्योपासक आहें. कुठल्याही 'सुदर' वस्तूच चित्र काढायचा मला अधिकारच आहे."

"पुसून टाका तें चित्र ! नाहींतर मीच टाकतें नाहीस करून." ती रागाचा आव आणून म्हणाली व त्यावर रेती टाकणार— इतक्यात त्यानेंच चित्र आपल्या हातरुमालाने झाकून टाकले.

इन्दूचा नाइलाज झाला. ठसक्यानें ती आपल्या जाग्यावर जाऊन बसली. जोराने चालल्यामुळे तिच्या पायानी उधळलेली रेती वाऱ्याने चद्रकान्ताच्या डोळ्यात उडाली.

"चागली शिक्षा केलीस !" तो डोळे चोळीत म्हणाला.

झालेला प्रकार इन्दूच्या ध्यानीं यायला वेळ लागला नाहीं. तिला वाईट वाटलें.

'डोळ्यात फुकर घालू का ?' असा विचार चटकन तिच्या मनात येऊन गेला, पण तो तिनें दाबून टाकला.

"खरच ! मला वाईट वाटत ! मी मुद्दाम तस करीन अस वाटत का तुम्हाला ?" ती काकुळतीला येऊन म्हणाली.

"इतक काय मनाला लावून घेतेस ?" तो हसून म्हणाला.

"मास्तर !"

"काय इन्दू ?"

"मी तुम्हाला एक प्रश्न विचारू का ?"

"कसला ?"

पण तेवढ्यातच इन्दूचा विचार फिरला. ती स्तब्ध राहिली.

"कसला प्रश्न ?"

"छे—उगाच ! आपली थट्टा केली तुमची—" ती खोटें बोलली.

"खोट कशाला ? उगाच एकाद्याची जिज्ञासा का वाढवावी—आपल्याला सागायच नाहीं तर ?"

इन्दूच्या चेहऱ्यावर गाभीर्याची छटा पसरली. प्रश्न विचारावा कीं नाहीं याचा तिला, सदेह पडला.

"माझा आग्रह नाहीं" तो म्हणाला.

"विचारू ?"

"हो ! अवश्य विचार."

"जीवन-स्वर म्हणजे काय ?"

चद्रकाताला आश्चर्य वाटलें. 'एवढा साधा प्रश्न अन् त्यासाठी एवढे आढेवेढे ?' तो आपल्याशींच म्हणाला.

"तूच साग पाहू ?" तो तिला म्हणाला.

"मला नाहीं कळत."

"प्रयत्न तर कर ! नाहीं आल तर सागतों."

"खरच-मला नाहीं समजत—" ती खालीं पहात म्हणाली.

"काय कळेल तेवढच साग." त्यानें आग्रह धरिला.

ती थोडा वेळ विचार करून म्हणाली.

"मला वाटत कीं, ज्या स्वरावर रागाच सौन्दर्य, माधुरी, म्हणजेच-जीवित अवलबून असत, आणि रागाच वैशिष्ट्य राखण्याकरिता जो स्वर पुनः पुनः घ्यावा लागतो तो त्या रागाचा

जीवन-स्वर आणि.. आणि त्याच स्वरावर वेळोवेळी थाबायच, होय ना ?" तिचे शब्द साधेच होते, पण ती घोटाळल्याप्रमाणे दिसत होती. ती गभीरपणानेच बोलली, पण पुढे गोधळून स्वस्थ बसली.

"त्या स्वरावर येऊन थोडस थाबायच, पण पूर्ण–विराम नाही घ्यायचा." तो खोचून म्हणाला.

"पण तुम्हाला काय वाटत ते सागा आता." तिने आग्रह धरिला.

"खरच इन्दू, मी आणखी काय सागणार ?"

"आता का उगाच ओढून धरता ?"

"मी जे सागणार होतो तेच अगदी माझ्या मनात असलेल्या शब्दात ततोतत सागितलस." तोहि प्रामाणिकपणे उत्तरला.

"खरच ?" तिने किचित् हसून पण शातपणे विचारले.

"अगदी खर !"

"हें अस कस झाल ?"

"मला काय ठाऊक ? पण–" तो आणखी काही बोलणार होता; पण त्याला अवसर न देता इन्दू पुढे बोलू लागली

"पण काय ? खरच सागा, मी अगदी तुमच्या मनातल बोललें?" तिनें मनापासून विचारले.

"आताच नाही केवळ–पण बरेच वेळा होत अस माझ्या मनातले विचार पुष्कळ वेळा तू जसेच्या तसे बोलून दाखवितेस. मलाही आश्चर्य वाटल पहिल्या पहिल्यादा." बरेच दिवस त्याच्या मनात असलेली गोष्ट त्याने बोलून टाकली.

"खरच, मास्तर ! अगदी तुमच्यासारखीच माझी स्थिति आहे. तुम्हाला खर नाही वाटायच, पण माझ्या मनाच चित्रच जस काही

तुम्हाला दिसत असाव अशा तऱ्हेन तुम्ही बोलता पुष्कळदा. एखादा विचार माझ्या मनात येतो, अन् मी तुम्हाला सागणार, इतक्यात तुम्ही तेंच बोलून दाखविता."

"खरच?"

"अगदीं खर! असं का बर होत हें?" तिनें विचारले.

तो विचारात पडला. त्याला कळून चुकले की दोघानीही एकच गोष्ट दुसऱ्यापासून लपवून ठेविली होती. नकळतच तो थोडासा गोंधळून गेला.

"काय बर कारण याच?" तिनें पुनः विचारिले.

"मला नाही सागता येत!"

"मग कोण सागणार मला? गुरुजी ना तुम्ही?"

"सगीतापुरता."

"मनापासून बोलता हें?"

"बाबाना विचार."

"अस काय बर? मी मनापासून श्रद्धेनेच म्हणाना–विचारतें आहे. तुम्हाला सागता येईल असा मला विश्वास वाटतो."

"अस्थानीं आहे तुझा विश्वास" तो बेफिकीरपणें म्हणाला.

"ते कसही असल तरी मी विश्वासान विचारतें एवढच मला माहीत. खरच, विचार करून उद्या सागा हव तर–पण उत्तर देण काही चुकणार नाहीं तुम्हाला." तिनें बजाविले.

"बर! उद्या सागेन, पण सागता येईलच अशी खात्री नाहीं देता येत."

थोड्याच वेळानें तीं घरी परतली. इन्दूला तिच्या घरीं पोंचवून चद्रकात आपल्या बिऱ्हाडीं गेला.

इन्दूच्या प्रश्नानें चद्रकान्ताचें मनःस्वास्थ नाहीसे करून टाकिलें होते.

तो बिछान्यावर पडला होता, पण डोक्यात विचारानीं गोंधळ माजविला होता.

'का ?' हाच इन्द्चा प्रश्न होता.

"दोघाच्या विचारात हें विलक्षण साम्य का ?" तो स्वतःशीच विचार करू लागला.

"का ?" इन्दूचा प्रश्न चद्रकाताचें मनच त्याला विचारूं लागले. त्यानें आजपर्यंत हा प्रश्न जाणूनबुजून दूर लोटला होता, पण आता त्याला तो चुकविणे शक्य नव्हते. सर्व शक्ति एकवटून तो प्रश्न एखाद्या राक्षसाप्रमाणे त्याला भिवविण्यासाठीं उभा राहिला—

"का ?"

"कुठल्याही गोष्टीतील 'का' या प्रश्नाचे समर्पक आणि मूलभूत उत्तर देणे म्हणजे साऱ्या विश्वाचे कोडे सोडविण्यासारखेच नाही का ?"

चद्राच्या सान्निध्यात सागराचे हृदय का भरून येते ?

भगवान् सहस्त्ररश्मि कुणाच्या शोधात दररोज आकाशातून भ्रमण करीत असतो ?

सूर्यास्तानतर सूर्यफूल अधोमुख का होते ?

—असे कितीतरी प्रश्न आहेत की ज्याचे समर्पक उत्तर देणे हें अद्यापि मनुष्याच्या बुद्धिमत्तेला शक्य झाले नाही. आणि ते देता येईल कीं काय याचा सशय सूज्ञाना अजूनही वाटत आहे.

हें विश्वच निर्माण का झाले ? ..

'मला जन्माला घालण्यात काय हेतु ? आणि इन्दूचा आणि

माझा परिचय तरी होण्याचा योगायोग का यावा ?' तो आपल्याशीच विचार करू लागला. 'का ?' हा प्रश्न अधारात तरगू लागला.

'शेवटी अज्ञेय वादच खरा ठरणार की काय ?'

मग या साऱ्या प्रश्नाचे उत्तर कसें मिळणार ?

आणि उद्या इन्दूला काय उत्तर द्यायचे ? काही तरी उत्तर हे दिलेच पाहिजे.—पण काय उत्तर देणार ?

'का ? हे विचारसाम्य का ?'

'विचारच सोडून द्यावा' त्याला वाटले. 'का' हा प्रश्न पदोपदीं अडवू लागला, मग विचाराची प्रगति कशी होणार ? "बस्स, विचारच करायचा नाही !"—त्याने निश्चय केला आणि निद्रादेवीची आराधना करू लागला. पण विचार त्याला सोडीनात.

तो बिछान्यावरून उठून खोलीत येरझारा घालू लागला, आणि मनात विचाराची मालिका चालू झाली.

बाहेर चादणे स्वच्छ पडले होते, व सारी सृष्टी चद्रकिरणात स्वस्थ विश्राति घेत होती.

त्याला फिरून इन्दूची आठवण झाली.

तिच्याशी परिचय होऊन पुरते वर्षही झाले नव्हतें. पण तिच्या मोकळ्या, सरळ व प्रेमळ स्वभावामुळे तिचा त्याचा बालपणापासून स्नेह असावा इतका आपलेपणा त्याच्यात वाढला होता.

टेबलावर भितीला टेकून ठेविलेल्या दिलरुब्यावर चद्रकान्ताची दृष्टी पडली.

सगीतामुळेच चद्रकाताचा इन्दूशी परिचय झाला होता.

सगीताच्या कारणानेच त्या परिचयाचे स्नेहात रूपान्तर व्हायला अवसर मिळाला होता.

त्याला वाटले, सगीताच्या गूढ तत्त्वातच कदाचित् इन्दूच्या प्रश्नाचे उत्तर सापडणार नाहीं कशावरून !

तो दिलरुब्याजवळ गेला आणि मोठ्या अभिमानानें त्याकडे पाहू लागला. आणि त्याच वेळी कुठेतरी वाचलेल्या कवितेंतल्या दोन ओळी त्याला आठवल्या—

'लहरी उठे एका हृ·ीं, पडसाद ये हृदयांतरीं–'

त्याच्या चेहेऱ्यावर आनदाची छटा पसरली आणि त्यानें हळुंच दिलरुब्याची मुख्य तार बोटानेच छेडली

रात्रीच्या प्रशात वातावरणात छेडलेल्या तारेने तरफाच्या सहाय्याने आपले माधुर्य खोलीत पसरून टाकिले.

'किती साधी गोष्ट ! सापडले उत्तर !' तो स्वतःशीच म्हणाला. त्याला पराकाष्ठेचा आनद झाला होता.

तो बिछान्यावर पडला व घडाळयात बाराचे टोले पडू लागले. आनद आणि समाधान यामुळे त्याचे डोळे आपोआपच मिटले.

\+ + +

चन्द्रकान्ताच्या समोर इदू वाळूवर त्याच्याशी बोलत बसली होती. नेहमीप्रमाणेच्च आवडतें निळे पातळ ती नेसली होती. मोहक केसाची वेणी पाठीवर खेळत होती. कपाळावरचे नाजुक केस समुद्रावरून येणाऱ्या मद वाऱ्याशी मनोहर नाच करीत होते.

दोघेही नदीसमुद्राच्या सगमाकडे पहात होती.

"ह्यात कधी फरक होईल का ?" तिने विचारले.

"होईल कदाचित्"

"मला नाही वाटत !"

"आपण बसलो आहोत इथें समुद्रच होता पूर्वी."

"मग तेव्हा नदी कुठे होती ?"

"अर्थातच पलीकडे— वरच्या बाजूला." नदीच्या उगमाच्या दिशेकडे बोट दाखवून तो म्हणाला.

"समुद्र मागे सरला, पण नदीन काहीं त्याला सोडल नाहींच कधी !" ती हसत म्हणाली.

त्याला चमत्कारिक वाटले. तो पुनः सगमाकडे पाहू लागला.

"तें पहा काय ते—" जवळच काही हालताना दिसले त्याकडे बोट दाखवून इन्दू म्हणाली.

"कुठे ?" चद्रकान्ताचे लक्ष त्याकडे गेले.

भुग्याएवढा एक किडा कसलासा गोळा जमिनीवरून लोटीत घेऊन चालला होता.

"काय आहे ते ?" तिने विचारले.

"तो किडा शेणामातीचा गोळा लोटीत योग्य जागी घेऊन चालला आहे."

"का ?"

"आपल्या पिलासाठी अन्नाची तजवीज करतोय् तो."

"कुठ आहेत ती पिल ?"

" त्या गोळ्यात, अंड्याच्या स्वरूपात."

"अन् अन्न ?"

"त्याच गोळ्यात"

"हे अस का ?"

"निसर्गाची शिकवण." तो म्हणाला.

"मी गोळा फोडून पहाते."

"नको—" तो ओरडला.

"पहाणारच!" ती म्हणाली व गोळा फोडण्यासाठीं तिनें हात पुढें केला.

चद्रकान्ताला तें आवडलें नाहीं. तिचा हात त्याने मध्येंच पकडला ..

"हे काय?" ती झटकन् हात सोडवून म्हणाली.

"काय केल मी?" चद्रकान्त दचकून म्हणाला.

डोळे उघडून त्यानें पाहिलें—आणि तो एकदम खजील झाला. इन्दू आपल्या हाताकडे पहात अधोमुख उभी होती व तिचा चेहरा आरक्त झाला होता.

"स्वप्नच तर ते! इन्दू, मला क्षमा करशील ना?" एकाद्या गुन्हेगाराप्रमाणे तो ओशाळून बोलला.

खिन्नशा हास्यानेंच तिनें क्षमा दर्शविली.

"किती विलक्षण स्वप्न—"

"कसल स्वप्न?" तिनें चाचरत विचारलें. चद्रकातानें जसेंच्या तसे स्वप्न तिला सागितले. तिचा तात्काळ विश्वास बसला.

"क्षमा करशील ना?"

"मला काय वाटत तें मला बोलून दाखविताच येत नाहीं." ती म्हणाली.

"मला कळल." तो उदासीनपणे म्हणाला.

"काय कळल?" तिनें अधीरपणेच विचारलें.

"तुझ्या मनातल सार कळल मला." तो म्हणाला. "पण आत्ता सकाळीच कशाला आलीस इथें?"

इन्दू चद्रकाताच्या घरीं जात असे पुष्कळदा, कारण चद्रकाताची आई तिला अगदी आपुलकीनें वागवीत असे. पण इतक्या सकाळी

येण्याचें कारण चद्रकाताला कळेना.

समोरच्या दिलरुब्याने त्याला इन्दूच्या प्रश्नाची आठवण करून दिली.

"तुझ्या प्रश्नाच्या उत्तरासाठी आलीस ?"

"पण माझ्या मनातल काय कळल ?"

"काही नाही ! खोटच सागितल मी "

"तें नाही चालायच" तिनें हट्ट धरिला.

"खरच, मलाहि बोलून दाखविता येत नाही"

"छान !"

आणि दोघेहि खरेच बोलत होती.

"प्रश्नाच उत्तर ?" थोड्या वेळाने तिने विचारले.

"आताच ?"

"हो आत्ताच !"

त्यानें दिलरुबा माडीवर घेतला आणि तिला म्हणाला, "नीट ऐक उत्तर, बर का !"

इन्दू ऐकू लागली.

त्याने मुख्य तार बोटानेच छेडली आणि ती खोली त्या नादाने भरून गेली.

"मिळाल उत्तर ?"

"थट्टा करता की काय माझी ?"

"आचरट आहेस अगदी ! दिलरुबा अजूनहि उत्तरच बोलतोय्."

"मला नाही कळत." तिनें आपले अज्ञान कबूल केले. "सागा ना ! हरले मी, मग तर झाल ?"

"बर, शिष्याच्या डोक्यात शिरेपर्यंत मास्तरन भरविल पाहिजे."

इन्दूला हसू आले. "भरवा तर ! " ती मिस्किलपणे उत्तरली.

चद्रकान्ताने सतार आणून इन्दूच्या हातीं दिली, व आपण दिलरुबा हातीं घेतला. दोघेहि समोरासमोर बसलीं.

चद्रकान्ताने दिलरुब्याची स्वर–तार छेडली.

"या स्वरात लाव सतार."

इन्दूने त्याप्रमाणे केलें.

"दोन्ही तारा एकदम वाजवं या." तो म्हणाला आणि मग दिलरुब्याच्या नादात सतारीचा स्वर मिसळून गेला.

"ठेव सतार खाली."

इन्दूने सतार जमिनीवर ठेविली आणि सतारीला अगदी टेकून चद्रकान्ताने दिलरुबा ठेवून दिला.

"आता काय उत्तर मिळत ते पहा. बावळटपणा करू नको. आता नाहीं कळल तर कधीच नाही समजायच."

औत्सुक्याने इन्दू त्या दोन्ही वाद्याकडे पाहू लागली. तिच्या हृदयाचे ठोके जलद पडू लागले होते.

"पहा बरं आता !" त्याने इषारा दिला.

अपेक्षेने श्वाससुद्धा कोंडून धरला तिनें.

चन्द्रकान्ताने दिलरुब्याची तार बोटानेच छेडिली आणि चटकन दिलरुबा बाजूला घेऊन त्या तारेचा कम्प थांबविला.

त्याने सतारीकडे बोट दाखविले—"तिला विचार उत्तर—" तो हळूच म्हणाला.

इन्दूने सतारीकडे पाहिले तों तिने नुकतीच स्वरात लावलेली तार अस्थिर झालेली तिला दिसली व त्या कम्पापासून निघालेला निनादही तिला ऐकू आला.

क्षणापूर्वी दिलरुब्याच्या तारेंतून निघालेला स्वर आणि आताचा सतारीचा स्वर अगदीं एक होते.

इन्दूला फारच आश्चर्य वाटले. 'यापूर्वीच ही गोष्ट आपल्या ध्यानीं कशी नाहीं आली ?' ती आपल्याशींच म्हणाली.

"मिळाल का उत्तर ?" त्याने विचारले.

"हो !" ती आनदानें उत्तरली. "सागू का ?"

"नको !"

"मास्तर"

"काय ?"

"मला खात्रीनच वाटत होतं, की तुम्ही माझ्या प्रश्नाच उत्तर द्याल म्हणून."

"पण आता तू कशाला आलीस ?"

"ओळखा पाहू ?"

"मला कल्पना नाहीं होत ! मी पराजय कबूल करतों."

"जेवायला बोलाविण्यासाठीं तुम्हाला."

"विशेष ?"

"आज माझा अठरावा वाढदिवस आहे म्हणून." अठरावा या शब्दावर जोर देऊन इन्दू म्हणाली.

"अठरावा ?"

"हो ! सज्ञान झालें मीं आज, बर का ! आता माझी मीच मुखत्यार यापुढे !"

"म्हणजे ? मला नोटीस देणार कीं काय ?"

"तस नव्हे हो ! आता कुणीही माझ्यावर कसलीच सत्ती करू शकणार नाहीं ! अगदीं बाबा सुद्धा—"

"कायद्याच वेड कुठून शिरल तुझ्या डोक्यात ?"

"तें कसंही असेना, मी बोलावतें जेवायला. येणार ना ?"

"बापाच्या घरात मुलीला मुळीं हक्क नसतो, बर का !" तो हसतच उत्तरला.

"नसू दे ! पण येणार ना ?"

"पाहू"

"आलच पाहिजे !" तिने हुकूमच केला.

"बर बुवा."

"मला वाटलच ! मम आत्मा गमलाऽ आ." ती पोरकटपणे गाऊ लागली.

"इन्दू ! बिहागचा जीवन-स्वर कोणता ?"

"कोणता का असेना ? इन्दूचा जीवनस्वर आज तिला मिळाला बर का !" ती हळूच पण लाजून म्हणाली.

---

[ प्रकाशन–स्थळ : 'यशवंत' १९३६. ]

## २

# अभिमान

दोनचार दिवसाच्या अविरत वृष्टीमुळे सारा रस्ता चिखला-पाण्याने कसा भरून गेला होता. अजूनही पाऊस झिम्‌झिम् पडतच होता. सारें वातावरण कुद बनून गेले होते आणि प्रसन्नतेला तर यत्किंचितसुद्धा कुठे थारा नव्हता.

नेहमी मोटारीतून फिरणारी माणिक, आज—अशा किळसवाण्या रस्त्यातून—जवळजवळ भिजत घरीं चालली होती. नाही म्हणायला तिने आपली छोटीशी जनानी छत्री उघडून धरली होती पण रस्त्याच्या तशा स्थितींत पाय घसरू नये म्हणून ती इतकी जपून चालली होती की छत्रीचा तिला विसरच पडला होता. छत्री उघडी असतानाही ती भिजतच चालली होती.

चिखलापाण्यातून 'सर्र र्रर्र' करीत एक सायकल तिच्या अगदीं

जवळून पुढे निघून गेली. अंगावर चिखल उडू नये म्हणून त्या आवाजासरशी ती चटकन् बाजूला झाली. पुढे गेलेल्या सायकल-स्वारानें मागे वळून तिच्याकडे पाहिलें—प्रश्नार्थी लांब चेहरा केला आणि मग मिस्किलपणें स्वतःशीच हसत आपला मार्ग सुधारला.

त्याच्या ह्या वर्तनाचा अर्थ कळणे तिला मुळींच अवघड नव्हतें. कारण तो तिच्याच कॉलेजातला एक जरासा 'जादा' असामी होता. मोटरीशिवाय न हालणारी माणिक आज चिखल तुडवीत चाललेली पाहून त्याला आश्चर्य—थोडीशी गमत वाटणे साहजिकच होतें.

पण त्यावर विचार करायला अवसर मिळण्यापूर्वींच पाठीमागून येणाऱ्या मोटरीचा आवाज तिला ऐकू आला. चिखलाची रंग-पंचमी अनुभवायला मिळू नये यासाठीं ती रस्त्याच्या अगदीं कडेला झाली.

पण व्हायचें ते झालेच !

आपादमस्तक रंगून निघायची, ती तिच्या चपळाईमुळे, फक्त कमरेपर्यंतच चिखलाचे शितोडे उडाले, इतकाच फरक.

तिरस्काराची एक बारीकशी रेषा तिच्या कपाळावर उमटून गेली. पण दुसऱ्याच क्षणीं तिच्या चेहऱ्यावर गंभीर शांतपणाखेरीज कशाचाही मागमूस राहिला नाहीं.

देशमुखवाडीच्या कोपऱ्यावर तिची गति नकळतच मंदावली. दूर, दुसऱ्या टोकाला असलेल्या एका इमारतीवर तिची दृष्टी क्षणभर खिळून राहिली. अल्पकाळच तिची चित्तवृत्ति बावरून गेल्यासारखी झाली आणि कसली तरी असह्य वेदना व्हावी तशी तिची स्थिति झाली.

पण— चेहऱ्यावर वाढणारा रक्तिमा आणि डोळ्यात जमूं

लागलेले अश्रू कुणालाही दिसू नयेत म्हणून निर्धारानेंच ती पुढें झटकली.

बंगल्याच्या फाटकातून आत शिरताच चिखलानें भरलेले पाय प्रथम तिनें बागेतल्या नळावर धुवून टाकले. असल्या प्रकारच्या अनुभवाला ती सरावलेली नव्हतीच म्हटलें तरी चालेल. नळाचें तें जोरानें पडणारें पाणी तिला किती गारगार वाटले. तिच्या आवडत्या किरमिजी पट्टयाच्या नाजूक चप्पलाची झालेली ती अनुकम्पनीय स्थिति पाहून तिच्या तोंडून सहानुभूतीचा शब्द निघाला, "इश्श !"

तडक आपल्या खोलीत जाऊन तिनें दाराला आतून कडी लावून घेतली. आभाळ भरून आलेले असतानासुद्धा खिडक्यांचे पडदे तिनें ओढून घेतले. चिखलापाण्याने माखलेले कपडे बदलून तिनें आपला देह कॉटवर जवळजवळ फेकूनच दिला.

तिला अगदी एकांत हवा होता !

बाह्य जगापासून तिनें स्वतःला कोंडून घेतले पण क्षणार्धातच हृदयात उसळून आलेल्या प्रचंड वादळात ती पूर्णपणे सापडली.

भावनांचा आवेग तिला असह्य झाला होता.

अन्यायानें दण्डिलेल्या एकाद्या निष्पाप बालकाप्रमाणें, डोळ्या-वाटे बाहेर पडणारी अंतरीची तळमळ मुळीसुद्धा आवरण्याचा प्रयत्न न करता अगदीं असहायपणें ती पडून राहिली.

आणि गतगोष्टींचा स्मृतिपट तिच्या मनश्चक्षूपुढून सरकू लागला.

कृतनिश्चयाप्रमाणे पायींच, पण किती उत्सुकतेनें आणि कसली तरी गूढ आशा मनाशीं बाळगून ती आज कॉलेजला गेली होती.

टर्मच्या आरंभीं चालणाऱ्या घडामोडींकडे तिचें मुळीसुद्धा चित्त

नव्हतें. तिला एका व्यक्तीच्या दर्शनाची विलक्षण उत्कठा लागून राहिली होती आणि त्याच शोधात तिची दृष्टी गढून गेली होती.

"आज पायींच?" एका मैत्रिणीनें तिला विचारले.

"मग बिघडल कुठे?" कॉलेजच्या फाटकावरची दृष्टी न वळविता माणिकनें जरा चिडक्या स्वरानेच उत्तर दिले.

"नाहीं म्हटल .." आबाड्यातले फूल नीट बसविण्याच्या मिषाने तिची मैत्रीण कसला तरी विनोद करण्याच्या प्रयत्नात डोकें खाजवू लागली.

पण दुसऱ्याच एकीला उकळी फुटली—"अगऽ! जखम अगदीं मेदूपर्यंत गेली बर काऽ?" माणिकच्या चिडक्या स्वराला अनुलक्षून तिचा टोमणा होता.

जखमेच नाव निघताच माणिक एकदम चमकली. तिच्या लक्ष्यात येण्याआधीच तिचा हात तिच्या डोक्यापाठीमागे गेला.

—आणि तत्क्षणीं मिस्किल हास्याचा प्रचड कल्लोळ त्या खोलीत दुमदुमून राहिला.

माणिकला मात्र हा वात्रटपणा असह्य झाला. ज्या गोष्टी विसरून जाण्याचा ती आटोकाट प्रयत्न करीत होती, त्याचीच नेमकी आठवण करून तिच्या जखमेवर मीठ घालणाऱ्या त्या बेजबाबदार बेअकली पोरीचा तिला सताप आला. तिचा चेहरा लालबुंद होऊन गेला.

घटा होण्याच्या आधींच पुस्तकें घेऊन ती खोलीबाहेर पडली.

थोडयाच वेळात घटा झाली आणि ती आपल्या तत्वज्ञानाच्या वर्गात गेली.

चेहऱ्यावर काहींही न दिसू देण्याचा ती कसून प्रयत्न करीत

होती पण उत्कंठेने तिच्या जिवाचा कोंडमारा झाला होता.

तिने वर्गांत दोन चार वेळा दृष्टी फिरविली—पण—

'पहिलाच दिवस आहे' तिनें आपल्या मनाचें समाधान करण्याचा प्रयत्न केला तरी पण तिला स्वस्थता वाटत नव्हती.

थोड्याच वेळात प्राध्यापकानी प्रवेश केला. त्यानी सस्मित मुद्रेने वर्गांत एकवार दृष्टी फिरविली, प्रत्येकाला "कस काय ? सुट्टीत काय केल ?" वगैरे मामुली प्रश्न विचारले.

मग एकदम कसली तरी आठवण होऊन ते गभीर झाल्या-सारखे दिसले.

अज्ञात अशा उत्कंठेने माणिकनें श्वासही कोंडून धरला—

पण पुढच्याच क्षणीं त्याच्या तोंडून बाहेर पडलेल्या शब्दानी तिला जबरदस्त धक्का बसल्यासारखे झाले.

ते म्हणाले "आपल्या ज्यूनियरमधले साने कॉलेज सोडून गेले. मला कळल कीं ते आफ्रिकेला गेले म्हणून... ! An exceptional type " एक लाब निश्वास सोडून त्यानीं पुस्तक उघडले.

* * *

सहा महिन्यापूर्वीचा प्रसग. पण—जसा काही कालच घडलेला असावा—इतकी स्पष्ट स्मृती माणिकच्या मनात, कोरीव मूर्तीप्रमाणे स्थान करून बसली होती.

पावसाळ्याला नुकताच आरंभ झाला होता, आणि आजच्या-सारखीच किंबहुना अधिकच—देशमुखवाडीच्या कच्च्या रस्त्याची केविलवाणी स्थिति झाली होती.

रात्रीचा नवाचा सुमार. काळोख मी म्हणत होता.

वर्षारंभींचा पाऊस मुसळधार पडत होता.

दोनच लाडक्या विजेच्या दिव्याच्या प्रकाशात त्या कच्च्या रस्त्याचे भीषण स्वरूप अधिकच भयकर वाटत होते.

साडेसहाचा 'शो' पाहून माणिक आपल्या भावाबरोबर—माधव-रावाबरोबर मोटारींतून परतली होती. देशमुखवाडीत शिरल्याबरोबर रस्ता नीट दिसावा म्हणून शोफरनें दिवे 'डीम्' केले.

बहुतेक सर्व रस्ता पाण्याखालीं बुडाला होता. मधला थोडासाच अरुद भाग मधून मधून डोकावत होता. त्याच मधल्या भागा-वरून, मोटार जात असलेल्याच दिशेने एक व्यक्ति जपून चालली होती.

खटाऱ्याच्या वाहतुकीमुळें रस्त्याच्या दोन्ही बाजना खोल अशा चाकोऱ्या पडल्या होया. त्यातून चालणे अशक्यच होते. त्यामुळ पाठीमागून येणाऱ्या मोटारीच्या दिव्याचा प्रकाश पाहून आणि विजेचा हार्न ऐकूनसुद्धा त्या व्यक्तीने मधला मार्ग सोडला नाही.

शोफरने पुनः हॉर्न वाजविला पण त्याचाही उपयोग झाला नाही.

आता मोटार त्या व्यक्तीच्या मागे पधरावीस हातावर येऊन पोचली होती. जुनापुराणा एक रेनकोट घट्ट लपेटून घेतलेला, उघडा बोडका, फार उच नाही पण धडधाकट असा एक तरुण शातपणे चाललेला मोटरीतील मडळीला दिसत होता.

शोफरने आणखी एकदा हॉर्न वाजविला.

त्या तरुणाने आपल्या हातानेच मागल्या मागे खुणाविले "जरा आस्ते"

पण एन्जिनचा घर्रर्र असा मोठ्याने आवाज करीत शोफरनें एक सारखा हॉर्न वाजवायला आरभ केला.

आणि त्या तरुणाने आता त्या मोटारीचें अस्तित्वही लक्षात घेण्याचें नाकारले.

मोटारीतल्या मडळीला त्याचा फार राग आला पण त्याना काहीही करता येणे शक्य नव्हतें पुढें तो तरुण आणि मागे 'शख' करीत ती मोटार, असे मधल्या आडव्या रस्त्याच्या कोपऱ्यापर्यंत चालले होते.

पण तिथें तो बाजूला सरण्याच्या तयारीत दिसताच आता पर्यंतच्या त्याच्या 'उद्धट' वागणुकीबद्दल त्याला अद्दल घडविण्याचे —मालक आणि नोकर ह्या दोघाच्याही मनात एकदमच आले.

"पहातोस काय ? रगव बेट्याला !" असे माधवरावानी मोठ्याने म्हणायला आणि शोफरने गतिवर्धकाला टाच द्यायला एकच गाठ पडली.

पण—

माधरावाचे ते शब्द कदाचित् त्या तरुणानेसुद्धा ऐकले असावेत्. कारण—

अत्यत त्वरेने तो बाजूला सरला, पण त्याहीपेक्षा अधिक चपळाईने कोपऱ्यावरचा एक भला मोठा दगड त्याने दोन्ही हातानी उचलला...

त्याच्या त्यावेळच्या चिडलेल्या सतप्त चेहऱ्यावरून, त्याने तो दगड बेलाशक मोटारीवर अदळला असता याबद्दल मोटारीतल्या लोकाची खात्री होऊन चुकली.

—आणि जितक्या त्वरेने यन्त्राचा आवाज चढा झाला होता तितक्याच त्वरेनें तो खाली पडला.

आश्चर्याचा धक्का ओसरल्यानतर अस्पष्टशा शिव्या देतच

शोफरने मोटर पुढें काढली. पण त्या तरुणाच्या अगावर पाण्याचा एक थेंबही उडविण्याची त्याला हिंमत झाली नाही.

ह्या प्रकारानें अपमानित झालेले माधवराव, जिरलेला शोफर आणि नुसतेच प्रेक्षकाचे काम करणारी माणिक यापैकी कुणीही घरीं पोहोचेपर्यंत शब्दसुद्धा उच्चारला नाहीं

* * * *

वर्षारंभी कॉलेज उघडण्याचा दिवस. लेडीज् रूमच्या खिडकीशी उभी राहून माणिक आपल्या मैत्रिणींशी गप्पागोष्टी करीत होती.

ज्यूनियरची पहिली टर्म आणि त्या पहिल्या टर्मचा पहिला दिवस. उगवत्या सूर्याच्या कोवळ्या किरणात बागडणाऱ्या फुलपाखराच्या आणि माणिकच्या आजच्या वृत्तीत मुळींच फरक नव्हता.

बाहेरचा पावसाळा तिला दिसत होता पण भासत नव्हता. तिला वाटत होते की आपल्याप्रमाणेच सारें जगही आनदाने बहरून का नाहीं जात ? हर्षभरित नेत्रानी ती चोहिंकडे भिरभिर पहात होती.

आणि—

—तिची दृष्टी एकदम स्थिर झाली.

पावसाने भिजून चिंब झालेला ओव्हरकोट घट्ट लपेटून एक व्यक्ति धीमेपणाने कॉलेजच्या फाटकातून आत येत होती.

थोड्याच दिवसापूर्वी देशमुखवाडीत घडलेल्या त्या प्रसगाची माणिकला एकाएकी आठवण झाली.

पोर्चखाली अदृश्य होईपर्यंत ती त्याच्याकडे स्थिर दृष्टीने पहात होती—आणि दर क्षणीं तिची अधिकाधिक खात्री पटत चालली होती.

'तोच असला पाहिजे' ती स्वतःशींच म्हणाली—आणि मग

तेव्हापासून तिच्या मनाला एका प्रकारची हुरहूर लागून राहिली. तिच्या उल्हसित वृत्तीत एकाएकीं गांभीर्य यायला काय कारण झाले हें जरी कुणासही कळलें नसले तरी क्षणार्धात झालेला हा फरक इतर मुलींच्या ध्यानात आल्यावाचून राहिला नाही.

माणिकनें विचार केला 'आला असला आपल्या कॉलेजात तर त्यात विशेष असं काय आहे? आपल्याच वर्गात थोडाच येतोय्! आणि—समजा तसा तो आला तरी—आपण घेतली फिलॉसफी! कशाला शिरेल तो ह्या आडरानात?'

पण, का कोण जाणे! तिच्या मनातून त्याच्या विषयींचे विचार मात्र जाईनात.

आणि 'फिलॉसफी'च्याच क्लासात जेव्हा त्याला तिनें पाहिला तेव्हा मात्र तिला वाटले, 'काय मेला योगायोग तरी!'

कुणाच्याही लक्षात न येईल इतक्या सावधगिरीने पण अत्यंत बारकाईने तिने त्याला न्याहाळला. तिची पुरेपूर खात्री झाली. त्यानेंही तिच्याकडे पाहिले, ती थोडीशी चमकली. पण दुसऱ्याच क्षणीं तिला आठवलें की, त्यावेळी मोटारीच्या आत काही दिवा नव्हता, आणि मग तिचा जीव खाली पडला.

नेहमीप्रमाणेच 'परिचया'खेरीज त्या तासाला काहीच झाले नाही. पण तिला हव्या असलेल्या बऱ्याच गोष्टी कळल्यामुळे माणिकला काही तो तास कमी महत्त्वाचा वाटला नाही.

—त्याचे नाव जयंत साने.

मुंबईच्या झेवियर कॉलेजमधून चांगल्या दुसऱ्या वर्गात इंटरची परीक्षा उत्तीर्ण होऊन तो पुढच्या शिक्षणासाठी पुण्यास आला होता.

कुणाला 'आवड' म्हणून तर कुणी 'विचारशील' म्हणून 'तत्त्व-

ज्ञान' घेतल्याचें सांगितलें पण त्यानें कांहींच कारण नाहीं दिलें.

वय विशीच्या बाहेर पण त्या मानानें जरा जास्तच गंभीरपणा —पोक्तपणा म्हणा पाहिजे तर—त्याच्या चेहऱ्यावर दिसत होता. शरीर-प्रकृति मात्र ध्यानात येण्याजोगी कणखर.

पण सर्वांत जास्त जर काहीं माणिकला विशेष जाणवले असेल तर, तो त्याच्या दृष्टीत चमकणारा निश्चयी, बेडर—करारीपणा—

तिचें मन आकर्षून घेण्यासारखे त्याच्यात विशेष काही तरी होते असे तिला वाटलें.

कदाचित् त्या रात्रीच्या प्रसंगी त्यानें दाखविलेल्या तडफदार वृत्तीचाही परिणाम असेल तो.

× × ×

त्यापुढील वृत्तान्त द्रुतगतीनेच तिच्या पुढून सरकू लागला.

अभ्यासक्रमाला आरंभ झाल्यापासून त्याची वागणुक कोणत्याही तऱ्हेने लोकांच्या नजरेत यावी अशी मुळीच नव्हती. कपडे नीट-नेटके पण विशेष खर्चाचे अथवा दिखावूही नसत, आणि त्याबाबत त्याचें विशेषसे लक्षही नसावे असेच वाटे. पण स्वभावतःच त्याची अभिरुची अशी होती की, जें इतरांना मुद्दाम करावे लागे तें त्याच्या बाबतीत सहजच होऊन जाई.

त्याचा आयुष्यक्रम कुठल्यातरी निश्चितपणें ठरलेल्या तत्त्वानें चाललेला असावा असे वाटे.

कॉलेजच्या वेळात अभ्यासाखेरीज इतर गोष्टीत फारशी जिज्ञासा त्याला नसे तरीही त्याला 'ग्रंथकीटक' म्हणणे युक्त झाले नसतें. त्याच्या वागण्यात आणि बोलण्याचालण्यात अशी विलक्षण नियम-बद्धता दिसे कीं सर्व मनोवृत्तींना पूर्णपणें स्वाधीन ठेवण्याचा निश्चय

केलेल्या संयमी माणसाप्रमाणे त्याचें वागणें दिसे. कुणाशींही तो मोकळेपणानें वागे तरी पण तो मितभाषणीच होता.

विद्यार्थिनींशीं बोलण्याची फारशी उत्सुकताही त्यानें दाखविली नाहीं कीं फाजील तुटकपणाचे प्रदर्शन करण्याचाहि प्रयत्न केला नाहीं कधी.

इतरापेक्षा त्याचें वागणे निराळेच वाटे पण त्यातसुद्धा एका प्रकारच्या वैराग्याची–सयमाची–छटा साहजिकपणेच उमटत असल्यामुळे काहीं दिवसानी त्याच्या बाबतींत "एक गूढ" असे ठरवून त्याच्या सहाध्यायानीं अधिक विचार करण्याचे सोडून दिलें.

आणि मग–त्याच्या स्वभावाची थोडीशी चमक दिसून येणारा प्रसंग घडून आला.

प्राध्यापकानी एक निबध लिहून आणायला सागितला आणि मानसशास्त्र-विषयक कोणताहि विषय निवडण्याची त्यानी मोकळीक ठेविली होती.

सर्वांनीं आपापले निबध ठरल्या दिवशीं दिले

त्यानें कोणत्या विषयावर लिहिला हे जाणण्याची माणिकला विशेष उत्कठा लागून राहिली होती तरी त्याला विचारण्याचा सकोच– थोडीशी भीतीच वाटली तिला.

तिनें मुद्दामच त्याच्याच शेजारच्या सहाध्यायाला विचारलें, "तुम्ही कशावर लिहिलात ?" अशा रीतीनें सुरवात केल्यानतर इतराच्या बरोबर त्याचाहि विषय कळेल ही तिची अपेक्षा.

पण तसे झालें नाही. इतरानी तिच्यापुढें आपल्या निबधाचे तपशीलही ठेविले पण त्यानें मात्र आपल्या निबधाचें नावही आपण होऊन सागितलें नाहीं.

त्याची मुग्धता पाहून तिनें तो विषय आटोपता घेतला. पण मनात त्याचा राग आला तिला. पुनः मनातसुद्धा त्याच्या विषयी जिज्ञासा बाळगायची नाहीं असें तिनें ठरवून टाकिलें–

निबंध तपासून परत करतेवेळी प्रोफेसरानीं त्याच्या निबंधाचा गौरवपूर्वक उल्लेख केला —आणि कर्मधर्मसंयोगाने तो त्या दिवशी गैरहजर.

या स्तुतीचा परिणाम त्याच्यावर काय झाला असता याचा माणिकला तर्कच करीत बसावें लागलें.

दुसऱ्या दिवशी वर्गात निबंधाची वही त्याला देताना ते म्हणाले "तुमची भाषाशैली आणि विचारसरणी मला विशेष आवडली. keep it up !"

त्याने वही घेतली आणि ओझरती पाहून ठेवून दिली.

तास संपल्यावर भीत भीतच माणिकने त्याला विचारलें, "मला तुमचा निबंध पहायचा आहे, दाखवाल ?"

त्याला थोडेसे आश्चर्यच वाटलें. काहीहि न बोलता त्याने वही पुढें केली.

"उद्या परत केली तर चालेल ?" तिने विचारले.

"तुमचा निबंध दाखवता का ?" त्यानें प्रतिप्रश्न केला.

"मी आज आणला नाही."

"उद्या आणाल ?"

"खरच अगदीं सामान्य आहे. पाहाण्यासारखा नाही."

"मग माझाही पाहाण्यासारखा नाही" त्याने वही घ्यायला हात पुढें केला.

ती थोडीशी गोंधळली पण लगेच सावरून म्हणाली,

"राहूद्या, मी उद्या आणीन माझा."

मदस्मित करून तो निघून गेला. माणिक पहातच राहिली त्याच्याकडे.

दुसऱ्या दिवशीं त्याची वही परत देताना ती म्हणाली "खरच, किती छान लिहिल आहे तुम्ही ! I wish I could write like that !"

पण ह्या स्तुतीने तो चढून गेला नाहीं.

"तुमचा ?" त्याने विचारले.

"मी नाहीं आणला."

"अस्सं !" त्याच्या स्वरात निषेध डोकावू लागला.

"खरच सागते, तुम्ही हसाल, इतका वाईट-उथळ आहे."

"म्हणून आणला नाहीं ?" त्यानें शातपणे विचारलें.

काय बोलावें हें तिला सुचेना.

तो वर्गात जायला फिरला.

"Excuse me !" ती चटकन् म्हणाली. "उद्या दाखवीन बरं का ! चुकलेच मी, तुम्हाला कबूल केल होत."

पुनः मदस्मित करून तो निघून गेला आणि माणिक अगदी ओशाळून गेली.

दुसऱ्या दिवशीं न चुकता तिने आपला निबध त्याला दाखविला. "Self-respect" स्वाभिमान या विषयावर लिहिला होता तिने.

त्याला थोडेसे आश्चर्य वाटलें. प्राथमिक शाळेपासून पुनरावृत्ति होणाऱ्या इतिहासाच्या विषयासारखेच स्वाभिमानावर निबध लिहिण्याचे प्रसग अनेक वेळा विद्यार्थ्यांवर येऊन गेलेले असतात.

बरे, मानसशास्त्रदृष्ट्या विवेचन करण्याइतका त्या वर्गाचा प्रवेशही झाला नव्हता त्या शास्त्रात.

पण निबंध वाचताना मात्र त्याला थोडीशी मौजच वाटली. चार दोन वाक्याच्या पुढे त्याने बारीकशा पण पुसून टाकता येण्यासारख्या खुणा केल्या. मधल्या सुट्टीत त्याने तो वाचून पुरा केला.

कॉलेज सुटल्यावर वही परत देताना तो म्हणाला, "किती सुंदर लिहिता तुम्ही"

तिला थट्टाच वाटली.

"I wish I could write like that! कसलं पेन वापरता तुम्ही? तुमचं अक्षर फारच सुंदर आहे" तो खेळकरपणाने म्हणाला.

"नुसतं अक्षर काय करायचं? मजकूर डफ्फडच आहे ना?" तिने वरवर हसत विचारले.

"कुणी सांगितलं?"

"काय सांगायला पाहिजे?"

"मला नाही तसं वाटत! पण मला एका वाक्याचा अर्थच नाही कळला." आठवल्यासारखे करून तो म्हणाला.

"कुठल्या!"

"काही व्यक्तींची स्वाभिमानाची कल्पना इतकी नाजुक असते की हवेतल्या वादळानेसुद्धा त्यांचा स्वाभिमान दुखावतो." त्याने तिच्या वाक्याचे भाषान्तर केले.

तिचा चेहरा आरक्त झाला पण ती कांहीहि बोलली नाही.

"पण निबंधाचं आवश्यक तत्त्व तुम्ही चांगलं पाळलं आहे" तो हसतच म्हणाला.

"कोणत तत्त्व ?"

"वैयक्तिक विचार"

"तुमच म्हणण मला नाही कळल" ती म्हणाली.

"म्हणजे लेखकाचे वैयक्तिक विचार द्यायचे असतात निबंधातून आणि हे तत्त्व पाळल्याचा भरपूर पुरावा सापडतो तुमच्या ह्या लिखाणात."

पण ती मात्र अधिकाधिक गोंधळून चालली होती.

दोघेही घरी जायला निघाली. माणिकने विचारले—

"कुठे राहता तुम्ही ?"

"देशमुख वाडीत"

"चला की ! मला त्याच बाजूनी जायच आहे."

पण कॉलेजच्या पोर्चमध्यें उभी असलेली मोटर पाहताच त्याच्या ध्यानात आले की ती आपल्याला 'लिफ्ट' देणार आहे.

एकदम आठवण झाल्यासारखे करून तो म्हणाला "क्षमा करा ह ! विसरलोच मी. मला लायब्ररीत जायच आहे." आणि तिच्या उत्तराची वाटही न पाहता तो निघून गेला सुद्धा.

× × ×

पहिली टर्म झपाट्याने निघून चालली होती आणि त्या दोघांचा स्नेहसुद्धा तितक्याच वेगाने वाढत होता.

त्याच्याविषयींची वयक्तिक माहिती मिळविण्याचा तिने पुष्कळ वेळा यत्न केला पण त्याचे मौन सुटले नाही. आणि आग्रहानें तोच विषय काढीत बसणे तिलाही इष्ट वाटलें नाही.

मात्र त्याच्या वागण्यातल्या एक प्रकारच्या 'अलिप्त' पणाबद्दल तिला राहून राहून आश्चर्य वाटे.

इटर कॉलेज क्रिकेट सामन्याच्या दिवशी कुणालाच माहित नसलेली एक गोष्ट विलक्षण योगायोगानेच तिला कळून आली.

मुंबईहून आलेल्या एका मैत्रिणीच्या बरोबर माणिकही तो सामना पहायला गेली होती. प्रेक्षकानी सारे मैदान फुलून गेले होते

खेळाला प्रारभ होण्यापूर्वी एका व्यक्तीकडे अगुलिनिर्देश करून ती मैत्रीण सहजच म्हणाली, "काय ग माणिक, साने नाही का खेळणार आज ?"

"म्हणजे ?" माणिकला आश्चर्य वाटणे साहजिकच होते

"अग, ते फार चागले खेळतात. गेल्या वर्षी जवळजवळ हरलेली मॅच त्यानीच जिकली म्हणायला हरकत नाही. अगदी कॉन्फिडट गेम आहे त्याचा"

"पण इथे तर एकदाही खेळले नाहीत मॅचमध्ये"

"खरच ?" मैत्रिणीने आश्चर्यानें विचारले.

"क्रिकेट खेळतात हेसुद्धा ठाऊक नसेल कुणाला"

तो विषय तेवढ्यावरच सपला. पण दुसऱ्या दिवशी, आपला त्यात थोडासुद्धा सबध न येईल अशा रीतीने माणिकने क्रिकेट-सेक्रेटरीच्या कानावर ती गोष्ट घातली—

आपला सघ अजिक्य करण्याची महत्वाकाक्षा कुणाला नसते ? सेक्रेटरीने लागलाच तपास करून पुढील सामन्यामध्ये खेळण्याचे अभिवचन जयताकडून घेतले.

प्रथम जयताला आश्चर्य वाटले, तरी खेळाडूवृत्तीला साजेशा सरळपणाने त्याने त्या विनतीचा स्वीकार केला.

सघात त्याचे नाव झळकले तेव्हा सर्वांनाच आश्चर्य वाटले.

माणिकने मात्र एका शब्दानेही त्याला विचारले नाही.

त्या सामन्यात जयंताने आपले नैपुण्य चागलेच दाखविले. मिळालेल्या विजयश्रीचे बरेचसे श्रेय त्यालाच होते व त्या दिवशी त्याचे नाव चोहिंकडे ऐक येत होतें.

पूर्वीच सघात सामील न झाल्याबद्दल प्रिन्सिपलसह सर्वानी त्याला दोष दिला आणि ह्या सामन्यातल्या त्याच्या उत्कृष्ट खेळाबद्दल त्याचे कौतुकही केले.

दुसऱ्या दिवशी त्याच्या वर्गातही त्याचे अभिनन्दन झाले आणि हसत मुखाने त्याने त्याचा स्वीकार केला

कॉलेज सुटल्यावर माणिकने त्याला सुनावले, "काही काही लोकाना किनई अगदीं आग्रहाच—वाजत गाजत बोलावण लागत .."

तिच्या बोलण्याचा रोख त्याला कळला व तो म्हणाला, "फितुरी आणि चहाडखोरी स्त्रियाच्या पाचवीलाच पुजलेली असते नाही तरी!"

"म्हणजे काय हो?" तिने अज्ञान पाघरले. पण त्याला कसे कळले याबद्दल मात्र तिला गूढच पडले.

तोच पुढें म्हणाला, "भलते उपद्व्याप करून वर गमत पहात बसायची हौस असते काही माणसाना."

आता तिनेही सामना द्यायचे ठरविले.

'लढायच सोडून लपून बसणाऱ्याना पुढे खेचलच पाहिजे.—बर झाल, कुणी तुमचा गौप्यस्फोट केला ते..."

"घ्या स्वत.चीच पाठ थोपटून..." त्याने तिचेच बिग फोडले.

"म्हणजे? — मी?—??"

"छे! तुमची ती मुबईची मैत्रीण!"

"अस्स! बरीच बारीक दृष्टी असते तुमची!"

"तिला पहाताच मला वाटल की बया करणार काहीतरी गोंधळ आणि तसच झाल."

"कालच्या विजयाबद्दल तुमच्यापेक्षा तिचेच आभार मानायला हवेत्" ती म्हणाली.

"त्याहीपेक्षा तुमचे!" त्याने दुरुस्ती केली.

'हो! हो, हवेतच." ठसक्यानेच तीही बोलली.

"तुम्हाला कल्पना तरी आहे तुम्ही केवढा गोंधळ करून ठेवला आहे त्याची?" तो जरा गंभीरच झाला होता.

"गोंधळ?" तिला त्याच्या बोलण्याचा अर्थ कळला नाहीं.

"जाऊ द्या! तुम्हाला नाही कळायच ते." आणि तो निघूनसुद्धा गेला.

* * *

त्याचा परिचय वाढत होता, स्नेहभाव दृढतर होत चालला होता.—पण त्याच्याबद्दल तिला वाटणारे 'गूढ' उकलणे मात्र अधिकाधिक कठीण होत चालले होते. पूर्वीपेक्षा तो तिच्याशी अधिक मोकळेपणाने वागे पण तिला मात्र अशा वेळी त्या रात्रीच्या प्रसगाची स्मृति बेचैन करून टाकीत असे.

सहामाही परीक्षेची नोटीस लागली तेव्हा तिच्या मनात आलें की आपण दोघानी एकत्र अभ्यास करावा.

बोलता बोलता सहजच तिने त्याला विचारले "परीक्षेला बसणार ना?"

"अभ्यास झाला तर बसणार आहे?"

"तयारी चागलीच असणार तुमची."

"मुळीच नाहीं."

"पण अजून खूप वेळ आहे की !"

"सहा मॅचिस खेळायच्या आहेत अजून."

"नाहीं खेळलात तर ?"

"मला शिष्टपणा मिरवायचा नाहीं."

"हाच तो गोंधळ, तुम्ही त्या दिवशी म्हणालात ? पण मॅचिस सोडून थोडा का वेळ आहे."

"मला दुसरीं काम असतात" तो चटकन् बोलून गेला. तिने प्रश्नांकित मुद्रेने त्याच्याकडे पाहिले. पण त्याने लगेच विचारले, "तुमचा अभ्यास कसा काय चालला आहे ?"

"बेताचाच"

"का बर ? तुम्हाला वेळ नसेलस नाही वाटत."

"अजून तितकासा मनापासून आरंभच नाही केला वाचायला. मला वाटल—'

"काय ?"

"आपण थोडे दिवस बरोबर अभ्यास केला तर ?" तिने चाच-रतच विचारले.

"ते कस जमणार ?"

"का बर?"

"मी तुमच्या घरी येणार नाही— आणि तुम्ही पण नाही येणार माझ्याकडे वाचायला."

"तुम्हाला आमच्याकडे यायला काय हरकत आहे ?" तिने विचारलें.

"तुम्ही याल का माझ्या सारख्याच्याकडे अभ्यासाला ?" त्याने तिलाच प्रतिप्रश्न केला.

ती कांहींच बोलली नाहीं.

"म्हणूनच मी येऊ शकत नाहीं तुमच्याकडे" तो म्हणाला.

"मला नाही पटत तुमच म्हणण. तुम्हाला नसल आवडत तर नका येऊ, पण आपणा दोघाना एकच नियम कसा लावता येईल?" तिनें पृच्छा केली.

"आपल्यामध्यें किती तरी फरक आहे, नाहीं का?" त्यानें पुनः जरा गभीरपणानेंच विचारले.

"मला नाही वाटत! आणि असलाच तरी मी माझ्या वागण्यात असला भेदभाव कधीच नाही बाळगत." ती जरा रागानेच बोलली. "तुमच्याच मनात अस का याव?"

"तुम्ही स्वतत्र आहात का?"

"का नाहीं?"

"तुमच्याकडे येणाऱ्या एखाद्या व्यक्तीला प्रतिबध करण दुसऱ्या कुणाच्या हाती आहे की नाही?"

या प्रश्नाचे उत्तर काय द्यावे हा मात्र तिला प्रश्नच पडला. पण लगेच ती म्हणाली, "तुम्हाला बोलावताना मी या गोष्टीचा विचार केलाच असेल की नाही?"

"पण मला माझ्या दृष्टीने नको का विचार करायला?" त्यानें किंचित् हसतच प्रत्युतर केले. "दुसऱ्याच्या घरी पाऊल टाकण्या-पूर्वी थोडा विचार करतो मी!"

"मुलुखावेगळी रीत आहे तुमची!" तीही हसतच म्हणाली.

"पण चुकीची नाही ना? मी तुम्हाला बोलावल तर एकदम याल तुम्ही?"

"विश्वास पटल्यावर का नाही येणार?"

"विश्वास पटल्यावर तुम्ही न बोलावताच येईन मी." त्यानें तिच्याच शब्दात उत्तर दिले.

तिनें फक्त असमाधानाचा नि.श्वास सोडला.– ती थोडीशी हिरमुसली होती

"हे पहा–" तो समजावणीच्या स्वरात म्हणाला, "माझ वागण तुम्हाला चमत्कारिक वाटेल पण माझा स्वभावच असा बनला आहे त्याला काय इलाज ?" बोलता बोलता तो गभीर झाला.

तो विषय तेवढ्यावरच सपला. पण जायला निघाल्यावर ती थाबली आणि त्याला म्हणाली, "अभ्यासाला नसल यायच तरी एकदा चहाला या माझ्याकडे. खरच, पुष्कळ दिवस माझ्या मनात आहे. केव्हा येता ?"

त्याच्या मनाचा निश्चय होईनासें दिसले.

"एवढा काय मोठ्ठा प्रश्न पडलाय् ?"

"येत्या रविवारी तीन आणि चारच्या मध्यें येईन"

"Thanks ! मी वाट पाहीन ह. चुकू नका."

\+ \+ \+

एकाच दिशेनें पण वेगानें जाणाऱ्या दोन नावा अगदी जवळ जवळ आणणे किती अवघड असते याची कल्पना अनुभवी दर्यासारंगाला असते. एकमेकाच्या बाजूने मध्यें बरेच अतर ठेवून अगदी समातर त्या सहज चालविता येतील. पण त्याची गति कायम असेतो त्याना फारसे निकट आगता येत नाही. याचे कारण, त्याच्या मधून तितक्याच वेगाने विरुद्ध दिशेनें घुसणारे पाणी त्याना सारखं दूर लोटीत असते.

माणिकला कळून चुकले कीं परिस्थितीचा प्रवाह तिला जयता-

पासून दूर लोटीत होता. त्याच्या जीवित नौका जवळजवळ येण्यासाटी काहीतरी वेगळीच घटना घडून येणं अवश्य होते. तिच्या अभावीं त्याच्या स्नेहाला एक प्रकारची अनुल्लंघनीय अशी मर्यादा —सीमा—पडल्यासारखे झाले होते.

जयताने आपला शब्द पाळला नाहीं याचें तिला मनस्वी वाईट वाटलें आणि रागही आला.

कॉलेजात भेट होईल तेव्हा त्याला काही विचारायचाच नाहीं असा तिने मनाशी निश्चय केला. हो ! माणमाला स्वाभिमान म्हणून काही आहेच की नाही ?

पण तो कॉलेजातच आला नाहीं दुसऱ्या दिवशीं.

आणि स्वाभिमान बाजूला ठेवून त्याची चौकशी करायचें ठरविलें तिने परतु त्यातही व्यावहारिक अडचणी होत्याच कारण दुसऱ्या कुणाला विचारावे तर उगाच तेवढ्याशा गोष्टीवरूनसुद्धा एकादे 'प्रकरण' निर्माण करण्याइतकी कल्पकता कॉलेजच्या तरुण-तरुणींत असते याची पुरती जाणीव होती तिला.

आपणच त्याच्या खोलीवर जाऊन चौकशी करावी अशी तीव्र इच्छा तिला झाली—पण तसे करण्याचा तिला सकोच—त्याहीपेक्षा भीति वाटली—हो ! कुणी पाहिले तर ?

खरें सागायचें म्हणजे आजच्या सामाजिक परिस्थितींत बहुतेक मुलीच्या बाबतींत ही कुचबणा अनुभवाला येते. 'परत भेटी'ची अपेक्षा करणाऱ्या तरुणानी मुलीना 'आजीबाई' 'आर्य स्त्री' वगैरे उपहासात्मक कितीही विशेषणें लावलीं तरी— त्यानी उत्क्राति आणि क्राति यातला फरक ध्यानात ठेवून वागणे अधिक हिताचें ठरेल.

अर्थात् त्याच्या खोलीवर जाण्याचा विचार तिनें सोडून दिला. घरी येताच तिला जयताचें पत्र मिळालें.

नमस्कार विशेष,

कबूल केल्याप्रमाणें मी आलों नाहीं म्हणून तुम्ही रागावला असाल पण एका आकस्मिक अडचणीमुळे मला येण अशक्य झाल. तुम्ही क्षमा करालच.

जयन्त साने

पत्राच्या औपचारिकपणापेक्षाही त्यातील तुटकपणाचें आणि मुग्धतेचें तिला आश्चर्य वाटलें.

× × ×

टर्म संपत आली होती. वर्षाऋतूचें राज्य काहीं संपलें नव्हतें. अधाऱ्या रात्रीची भेसूर छाया साऱ्या पुण्यावर पसरली होती. मोटर देशमुख वाडींत वळली तेव्हा अकारणच माणिकच्या छातीत धडधडू लागलें, आणि पूर्वीचा तो चमत्कारिक प्रसंग स्मृतिरूपाने तिच्या डोळ्यापुढें उभा राहिल्यामुळें ती अस्वस्थच झाली थोडीशी.

पण—

डोळ्यावर विश्वासच बसेना तिचा.

पुनः तोच प्रसग ? अगदीं तसाच—

भीतीनें तिनें श्वाससुद्धा कोंडून धरला—बोलणे तर दूरच.

चिखलापाण्याचे फवारे उडवीत मोटर आपल्याच दिव्याच्या प्रखर प्रकाशात, जणू सूड घेण्यासाठींच, धीमेपणानें पुढे चालणाऱ्या व्यक्तीचा वेगानें पाठलाग करीत होती.

त्या व्यक्तीने मागे वळून वेग कमी करण्याबद्दल इषारा दिला.

त्या तीव्र प्रकाशात जयन्ताची निर्भय व शात दृष्टी पाहून माणिकला अधिकच भीति वाटली.

मोटारीची अनिरुद्ध गति ध्यानात येताच त्यानें रस्त्याची कड गाठण्यासाठीं त्वरेनेच एक दोन पावले टाकलीं—

पण माधवरावानी त्याला ओळखला होता. त्याना पुरता सूड घ्यायचा होता. "चागला सापडला" असे म्हणून त्यानीं दातओठ खाऊन जोरानेच गतिवर्धक दडपला माणिकच्या गोंधळलेल्या शब्दाकडे लक्ष देण्याच्या मनःस्थितींत नव्हते ते—

* * * *

"कस काय वाटत तुम्हाला आता ?" नुकतीच शुद्धीवर आलेल्या माणिकला नर्स विचारीत होती.

माणिकनें आपली क्षीण दृष्टी तिच्याकडे फिरविली. तिला बोलायचे होते पण तेवढीसुद्धा शक्ति राहिली नव्हती तिच्या अगात.

नर्सने तिला कसलेसे उत्तेजक औषध पाजले आणि थोड्याच वेळात तिला अधिक हुशारी वाटू लागली.

नकळतच तिचा हात बॅडेज केलेल्या जागेकडे गेला. डोक्याच्या पाठीकडील बाजूला होणाऱ्या वेदना आता तिला जाणवू लागल्या होत्या.

नर्सने कोमलपणेच पण थोड्या अधिकारवाणीने, हालचाल न करण्याविषयीं तिला बजावले.

पुनः ती डोळे मिटून स्वस्थ पडली— आणि घडलेला प्रसंग तिला अंधुक अंधुक आठवू लागला.

माधवरावाचा आततायीपणा—

मोटरीने उडविलेल्या चिखलाने माखलेली जयताची आकृति—आणि मोटरीची मागची काच एकाएकीं फुटल्याचा आवाज.

नुसत्या आठवणीने तिच्या अंगावर काटा उभा राहिला.

"जन्माची अद्दल घडेल बदमाषाला" माधवरावानीं रागानेच उच्चारलेले शब्द तिला ऐकू आले.

दचकून तिने डोळे उघडले आणि बावरलेल्या नजरेनें ती त्याच्याकडे पाहू लागली.

अजूनही त्याचा चेहरा विलक्षण क्रुद्ध दिसत होता—पण तिच्याकडे दृष्टी वळताच त्यानीं कोमलपणा धारण केला.

"बर वाटत ना आता ?"

तशा स्थितींतसुद्धा तिने हसण्याचा यत्न केला.

"घाबरू नकोस ! तसा मोकळा नाहीं सोडीत त्याला." तिला धीर देत असतानाच आपल्या पुढील बेताची जाणीव तिला करून दिली त्यानी

"म्हणजे ?" तिने चाचरत विचारले.

"चागला चारसहा महिने पाठवतों येरवड्याला" ते त्वेषानें म्हणाले.

"कुणाला ?" तिच्या स्वरात कातरता भरून राहिली होती.

माधवरावाना थोडेसे आश्चर्यच वाटलें पण लगेच ते म्हणाले, ' त्या बदमाषान दगड मारला—आणि तुला इथे आणावी लागली. हो, बाकी तुला कस कळणार ? पण म्हणाव, जन्माची आठवण राहील बेट्या ! वर सभ्यपणाचा आव आणतो बेशरम. बसलाय् गेटावर हवा खात."

"काय ? काय म्हटलस ?" तिची दृष्टी एकदम अस्थिर झाली.

"भलता उर्मट दिसतो. अगदीं निगरगट्टासारखा गेला पोलीस चौकीवर .." माधवरावाच्या स्वरात तीव्रपणा वाढू लागला. "म्हणे चिखल का उडविला ''

"दादा !" ती एकदम किंचाळली— आणि तिला पुनः मूर्च्छा आली.

* * * *

दोन दिवसानीं हॉस्पिटलमधून घरी आल्यावर, माधवरावानीं जयताविरुद्ध केलेल्या फौजदारी खटल्याची हकिगत तिला कळली.

त्याचप्रमाणे, तिच्याच कॉलेजातल्या आणि अगदीं तिच्याच वर्गातल्या विद्यार्थ्याकडून हा अत्याचार घडल्यामुळें लोकात तर्क-कुतर्क चालू असल्याचें जेव्हा तिला समजलें तेव्हा तर तिला धक्काच बसला.

आणि भरीत भर म्हणून खुद्द जयताचेंच पत्र तिच्या नावावर येऊन थडकलें तेव्हा मात्र ती अगदी बावरून गेली.

कापऱ्या हातानीच तिनें तें पत्र फोडले.

"नमस्कार विशेष,

काय लिहाव हें मला नीटसं कळत नसल तरी तुम्हाला पत्र लिहिण्याच मी धाडस करीत आहे. पण तुम्हाला त्रास देण्याचा हेतु नाही माझा.

अत्याचाराची प्रतिक्रिया अत्याचारात झाली. त्याचा न्याय, न्यायालयात लागेलच—

पण तुमच्यासारख्या निरपराधी व्यक्तीला नाहक इजा झाली याबद्दल मला किती वाईट वाटत तें लिहूनही दाख-विता येत नाही. कदाचित् माझ्याबद्दलचा तुमचा ग्रह

बदलला असेल आणि तस असल तर तुमचा दोष नाहीं. पण ह्या अकल्पित घटनेचा मात्र माझ्या आयुष्यावर फार परिणाम होणार हें उघड आहे. आणि अर्थातच एकदा परिस्थितीच्या वावटळीत सापडलों म्हणजे, माझ्या मनाला लागून राहिलेली अत्याचार–कलकाची पश्चात्तप्त तळमळ तुम्हाला सागायला कुठे सधि मिळणार ? पुनः पुनः ही जाणीव मला अस्वस्थ करते आहे— व्यक्तिशः तुम्ही मला क्षमा कराल का ?

मी माझ्या गुन्ह्याची कबुली देणार आहे– पण दयेची अगर क्षमेची याचना करणार नाहीं. माझ्या बचावासाठीं मीच काहींसुद्धा करणार नसल्यानें सर्वांचाच त्रास चुकणार आहे.

तुम्हाला फार लागल अस कळल– पण तुम्ही हॉस्पिटल मधून घरीं आलात हे ऐकून जरा बर वाटल.

क्षमा करा एवढीच विनति.

तुमचा अपराधी
जयत साने.

पत्रानें तिच्या मनात काहूर उठवून दिलें, आणि शारीरिक वेदनापेक्षा मानसिक तळमळ तिला अधिक असह्य झाली.

भीतभीतच, संधी साधून तिनें खटला काढून घेण्याविषयीं माधवरावांची विनवणी केली. पण—

“तुझ्या अब्रूला काळिमा लागायची वेळ आली आणि तुला भलते विचार सुचायला लागले ! लाज नाहीं वाटत ! तू म्हणतेस तस करण मला शक्य नाहीं.”

क्षणभर ती निरुत्तर झाली.

माधवरावच पुढें म्हणाले.

"वाटेल त्या माथेफिरूनं उठावं आणि वाटेल त्याच्या मोटारीवर दगड फेकावे— छट् ! असल्या बाबतींत गय करतां कामा नये."

"तो एकटाच अपराधी आहे का ?" थोडासा धीर करून तिनें शांतपणें विचारलें.

"म्हणजे काय ?"

"मला वाटतं, तो प्रसंग आपल्याला खासच टाळतां आला असता."

"अस्सं काय ? म्हणजे तूं सुद्धां त्या हलकटाला सामील अं ?" माधवराव एकदम चिडून म्हणाले.

तीहि आतां संतापली होती, तरीपण मनावर पूर्ण ताबा ठेवून ती म्हणाली, "बरंवाईट तुलाच जास्त कळतं माझ्यापेक्षां, तेव्हां तूं बोलशील तें ऐकून घेतलंच पाहिजे मला. पण मला वाटलं तें मी बोलून टाकलं." खिन्नपणें ती खिडकीबाहेर शून्य दृष्टीनें पाहूं लागली.

माधवराव निघून गेले.

—पण पुनः संध्याकाळीं त्यानींच तो विषय काढला.

"तो माफी मागायला तयार असला तर मी केस काढून घेतों."

"तो माफी मागेल—पण तुझी नव्हे—"

"मग कुणाची ?" त्यांनी तीव्रपणें विचारलें.

"माझी !"

"मला नाहीं वाटत ! आणि तुझी क्षमा मागितली तरी तेवढ्यानें माझं समाधान नाहीं होणार."

तिनें जयताचें पत्र त्याच्याकडे दिलें.

त्यानी ते सपूर्ण वाचलें तेव्हा ती म्हणाली, "प्रत्येकाला स्वाभिमान म्हणून असतोच."

"म्हणूनच त्याने माझी क्षमा मागितली तरच मी केस काढून घेईन." माधवरावांनीं आपला निश्चय बोलून दाखविला.

"तुझी मर्जी!"

"तू सागितलस तर तो खास माफी मागेल अस मला वाटत आता." तें पत्र पुढे करून ते म्हणाले. पण त्याचा स्वर मात्र तिला मुळींच आवडला नाहीं.

"आणखीन् काय वाटत?" तिने चिडून विचारलें.

"उगाच का रागावतेस?" माधवराव नरमून म्हणाले. "तुझा शब्द तो मोडणार नाही असच मला वाटत"

"फार चुकीची आहे तुझी कल्पना. आधीं दुसऱ्या कुणाकडूनही असल बोलण मी ऐकूनच घेतल नसत." तिच्या शब्दात अपमानाची जाणीव स्पष्ट दिसत होती. "मी त्याला काहींसुद्धा सागणार नाहीं आणि तोहि माझ ऐकणार नाहीं."

"मग मलाही काहीं करता येणार नाहीं." माधवराव रागारागाने निघून गेले.

माणिकने एक दीर्घ निश्वास सोडला.

× × ×

"मी सूचना देत असताही फिर्यादीने मुद्दाम मोटर बेफाम हाकून माझ्यावर चिखल उडविला— मी बाजूला सरण्याची त्वरा केली नसती तर मलाच हॉस्पिटलमध्यें जावे लागलें असतें.' जयताने निर्भयपणे आपली बाजू पुढे माडली होती.

"मोटरीचा रस्ता अडवून आरोपी चालला होता हॉर्नकडे त्याने मुद्दाम दुर्लक्ष केलें आणि त्याच्या अगावर चिखल उडणे अपरिहार्य होते." माधवरावाच्या वकिलाने खुलासा केला. त्याने आणखीही सागितले, "आरोपीने पूर्वी एकदा अशाच प्रकारची वर्तणुक केली होती याबद्दलही फिर्यादीजवळ भरपूर पुरावा आहे."

पण अवास्तव लाबत असलेली प्रश्नोत्तरे टाळण्याच्या उद्देशाने मॅजिस्ट्रेटनी जयताला विचारलें, "यानी मोटार मुद्दाम बेफाम हाकली याबद्दल तुमच्याकडे काय पुरावा आहे?"

"माझ्यावर उडालेला चिखल पोलिसानीसुद्धा पाहिला आहे."

"तेवढ्यावरून अस म्हणता येणार नाहीं"

"त्यापेक्षा अधिक पुरावा देता येण शक्य नाही"

शेवटी त्याला मॅजिस्ट्रेटनी विचारलें, "तुम्ही मोटरीवर दगड मारला ही गोष्ट तुम्ही नाकबूल करता काय?"

"नाही! पण रागाच्या भरात झाली ती गोष्ट."

"मग त्याबद्दल तुम्ही माफी का नाही मागितली? तुम्हाला तशी सधि देण्यात आली होती."

"चिखल उडविल्याबद्दल यानी माफी मागावी मग मीही त्याची क्षमा मागेन."

अर्थात् ही मागणी न्यायाधीशाना बेमुर्वतखोरपणाची वाटली. पण त्यानी फिरून एकवार त्याला समजाविण्याचा प्रयत्न केला.

"तुम्ही तरुण आहात, सुशिक्षित आहात. आपण काय करतो याच भान राहिल नाहीं तुम्हाला. अगदी आडमुठ्या अडाणी माणसासारखे वागलात. पण तुमच्या आयुष्याला conviction चा, शिक्षेचा काळिमा लागू नये म्हणून पुनः एकवार मी तुम्हाला सधि

देतो. तुम्ही क्षमा मागा आणि हें प्रकरण मिटवून टाका. नाही-पेक्षा माझं कर्तव्य मला करावंच लागेल."

"आपला आभारी आहे मी. पण मी माफी मागेन तर भेकड ठरेन असं माझं मन मला सांगत आहे. मी फिर्यादीच्या वागणुकीला स्वाभिमानाचं उत्तर दिलं, एवढंच मला सांगायचं आहे."

"पण तुमच्या ह्या 'स्वाभिमाना'च्या वागणुकीने दुसऱ्या एका निरपराधी व्यक्तीच्या जिवावर बेतली होती याची जाणीव आहे का तुम्हाला ?" मॅजिस्ट्रेटनी रागावूनच विचारले.

"आहे ! त्या बाबतीत मी अपराधी आहें, ..होईल ती शिक्षा भोगायला तयार आहे..." किंचित् काळ त्याला बोलणेही अशक्य झाले थोड्याच वेळात त्याने स्वतःला सावरले आणि म्हटले, "तरीसुद्धा फिर्यादीची क्षमा मी मागणार नाही."

काही एक न बोलता कोर्ट उठले.

दुसऱ्याच दिवशी निकाल जाहीर करण्यात आला. आरोपीला गुन्हेगार ठरवून पन्नास रुपये दंड अगर पंधरा दिवसाची साधी सजा देण्यात आली दंड भरण्याला आठ दिवसाची मुदत दिली होती.

*   *   *   *

निकाल कळल्यापासून माणिक अगदी बेचैन होऊन गेली होती. त्या एका गोष्टीशिवाय तिला कांहींसुद्धा सुचत नव्हते.

त्याने अपील करावे—आणि तसे झाले तर आपण होऊन त्यात त्याला साह्य करायचें इतका निश्चय मनाशी तिनें ठरविला. पण हिंडण्या-फिरण्याइतकी अजूनही तिची प्रकृति सुधारली नव्हती आणि त्यामुळे तिच्या मनाची विलक्षण तळमळ चालली होती.

दररोज ती वेड्यासारखी विचार करीत बसे. मनस्ताप असह्य झाला म्हणजे उशीत तोंड खुपसून रडे.

माधवरावानी तिची चौकशी करण्याचेही टाळलें होते.

तिची एक मैत्रीण तिला भेटायला आली होती. तिच्यामार्फत तिने जयताला कळविलें, 'तुम्ही अपील करा. मी स्वतः तुमच्या बाजूने पुढे येऊन तुम्हाला लागेल ती मदत करीन.'

पण अगदी सौम्य शब्दात त्यानें स्पष्ट नकार दिला आणि तिला लहानसे पत्र दिलें.

स. वि. वि.

'तुमच्या सहानुभूतिबद्दल मला तुमच उतराई होता येणार नाहीं. कृपा करून तुम्ही स्वतःला भलता त्रास करून घेऊ नका. तुमच्याबद्दल मला वाटणारा आदर मला लिहून व्यक्त करता येत नाही. पण शिक्षा भोगून झाल्याशिवाय मला शातता आणि समाधान लाभणार नाहींत— म्हणून क्षमा करा.'

तुमचा स्नेहाकित

जयत

पण ह्या प्रत्रानें हताश होऊन न जाता तिने अखेरची धडपड करून पाहण्याचें ठरविलें.

दडाची रक्कम भरून त्याने कारागृहवास तरी चुकवावा अशी तिची तीव्र इच्छा. त्याने दड भरला किवा नाही याची तिने त्या विश्वासातल्या मैत्रिणीमार्फत दररोज चौकशी चालविली होती.

निकाल लागल्याला आज सहावा दिवस होता. त्यानें दड भरला नव्हता किंवा अपीलही केलें नव्हतें.

पूर्वीच्याच ठिकाणीं तो रहात होता, हेंही तिला माहित होतें.

उद्यापर्यंत त्यानें दंडाची रक्कम भरली नाहीं तर ?

ती कल्पनाच तिला सहन होईना.

दुपारच्या शांत वेळीं ती आवेगानेंच बाहेर पडली. घरातल्या मंडळींचें आश्चर्य ओसरण्यापूर्वीं ती रस्त्याला लागली सुद्धा.

त्याच्या खोलीवर ती आजच पहिल्यांदा जात होती–पण संकोच सुद्धा वाटण्याच्या मनःस्थितीत ती नव्हती.

घाईघाईनें जिना चढून ती वर गेली. कापऱ्या हातानीच तिने दाराची कडी वाजविली.

त्याने दरवाजा उघडला— आणि तो आश्चर्यचकित होऊन पहातच राहिला तिच्याकडे.

ती इतकी क्षीण झाली होती कीं तेवढ्या श्रमानंच तिला घाम सुटला होता. दरवाजाचा आधार घेऊन ती कशी तरी उभी होती.

दीर्घ कालपर्यंत आजारी असावी तशी, अगदीं निस्तेज झालेली –सुकून गेलेली ती दिसत होती.

त्याच्यावर स्थिर झालेल्या तिच्या दृष्टींत असंख्य भावना भरून राहिल्या होत्या.

अशक्तपणामुळें ती आता पडते कीं काय असे वाटून जयताने चटकन् खुर्ची पुढें केली आणि म्हणाला "बसा पाहू आधी"

तिला उभी राहवतच नव्हतें, ती मटकन् बसली.

तो तिच्याकडे पहात उभा राहिला.

तिला बोलायचें होते पण बोलवत नव्हतें.

"कां आलात तुम्ही ?" शेवटीं त्यानेच आरंभ केला.

पण नुसते करुण दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें तिने.

तोहि काहीं बोलला नाहीं.

थोड्या वेळानें तिनें विचारले, ‘‘अपील करणारच नाहीं का ?”

“नाहीं !” तो निश्चयानेंच म्हणाला.

“दडाची रक्कम केव्हा भरणार ?”

“भरणार नाहीं !”

“का नाहीं ? तुमच्याजवळ पैसे नाहींत का ?’’

पण त्यानें उत्तरच दिलें नाहीं तिला वाटलें तीच अडचण असेल. ती लगेच आपल्या सोन्याच्या बागड्या उतरू लागली

तो एकदम चपापला. “काय चालवलें आहे तुम्ही !” त्याने तीव्र स्वरातच विचारलें.

पण ती नुसती पहातच राहिली त्याच्याकडे. तिचे डोळे अश्रूनी डबडबले होते.

तो तिच्यापासून एकदम दूर जाऊन उभा राहिला.

‘ तुम्ही मला भलत्या सकटात पाडता आहात्” तो म्हणाला.

“मुळींच नाही ! तुम्हीच अविचार चालवला आहे. आपल्या पुढल्या आयुष्याचा नाश करणार आहात का ?”

“तो का म्हणून ?” त्यानें निर्विकारपणे विचारलें.

“मग शिक्षेचा कलक धुवून काढा, अपील करा तुम्ही—मी तुमच्यासाठीं कोर्टात येईन—लागेल ती मदत करीन मी तुम्हाला”

“मला अपील कारायच नाही. तुम्ही माझ्यासाठींसुद्धा कोर्टात जाण मला मुळींच आवडणार नाहीं.”

“पण मला तुमच नाव कलकित झालेठ सहन नाही होणार. आणि प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष असा बराच सबध येतो त्यात माझा.’

“मुळीच नाहीं ! मला असल्या कलकाची मुळीच पर्वा वाटत

नाहीं. मी स्वाभिमानान वागलों एवढ समाधान काय थोड आहे ?”

“मग दड भरून टाका आजच्या आज !” तिनें बागड्या टेबलावर ठेविल्या.

“माझा अपमान करायला आलात का तुम्ही ?”

“नाहीं ! माझ्या मनाच्या समाधानासाठीं आलें आहें मी.” तिचा आवाजच तिच्या हृदयातल्या वादळाची साक्ष देऊ लागला. “मीच तुमच्या दडाची रक्कम भरून टाकणार आहे.”

“त्या बागड्या आधीं हातात चढवा पाहू ! तुम्ही मिळविल्या आहेत का त्या ?”

“माझ्या बाबानीच माझ्यासाठीं केलेल्या आहेत त्या. दुसऱ्या कुणाचाही संबध नाही त्याच्याशीं.”

“मग त्याच्या स्मृतीसाठीं तरी त्या परत चढवा पाहू !”

“तुम्ही दड भरलेला कळल्याशिवाय नाहीं !” ती अगदीं निश्चयानेंच बोलत होती.

“मी दड भरणार नाही” तितक्याच निश्चयानें तो म्हणाला.

“मग काय तुरुगात जाणार तुम्ही ?” ती जवळजवळ किंचाळली व एकदम उठून उभी राहिली. क्षणार्धात तिच्या चेहरा लालबुद होऊन गेला.

अगदीं शातपणें तो तिच्याजवळ येऊन म्हणाला, “तुम्ही काय चालवल आहे एवढा वेळ ? कशाला आलात इथें ?”

“माझ ऐका ना जरा !” तिचा आर्जवी व करुण स्वर त्याच्या हृदयाला अस्वस्थ करू लागला होता. “माझ्या मनाची स्थिती कशी कळणार तुम्हाला ? खरच मला अगदीं सहन होत नाहीं आता.”

आणि खरोखरच, दोन्ही हातानीं आपले तोंड झाकून ती रडू लागली.

तो अगदीं गोंधळून गेला. मोठा चमत्कारिक प्रसंग होता तो.

अस्वस्थपणेंच तो खोलींत येरझारा घालू लागला. पुनः तो खिडकीपाशी जाऊन उभा राहिला. अज्ञात अशा अनेक भावना त्याच्या हृदयात उचबळून येऊ लागल्या. त्याला परिस्थितीची आणि त्याहीपेक्षा स्वतःची एकाएकी विलक्षण भीति वाटू लागली.

"तुम्ही जा आता!" तो शेवटी म्हणाला.

तिने त्याच्याकडे पाहिले पण त्याला मात्र तिच्याकडे पाहवत नव्हते.

"मी काय कराव अस वाटत तुम्हाला?" दूर कुठे तरी पहात त्याने विचारलें.

"अपील करायच नसल तर दड भरून मोकळे व्हा"

"बर!" तो शातपणें म्हणाला.

"आणि तोसुद्धा तुम्ही नाही भरायचा. मी भरणार!" एखाद्या लहान मुलीप्रमाणे, मध्येंच येणारा हुदका दाबून टाकण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली.

"तेवढ मात्र नाहीं ह! माझ्याजवळ आहेत पैसे."

"पण मी नाही भरू देणार" तिने हट्ट धरिला.

"अहो, पण मग मला तुरुगात जाव लागेल ना!" त्याने गभीरपणा एकदम सोडून दिला आता.

"अस काय करता?" पावसानतरचे उन्ह चमकू लागले.

त्याने आपली ट्रंक उघडून नोटा, रुपये आणि चिल्लर स्वरूपात पन्नास रुपयाची रक्कम तिच्या पुढ्यात ठेविली.

"झाली ना खात्री ?"

"नाहीं! अजूनही फसवाल मला. विचित्र आहात अगदी!"

"पण आता जा तुम्ही." तो म्हणाला.

"तुम्ही येता का मला पोचवायला ?"

"लोक काय म्हणतील.. ?"

"आपणच म्हणू त्याना काही तरी—"

* * *

मोठ्या आनदातच घरीं आली ती. तिच्या मनावरचे एक मोठे दडपण उतरल्यासारखे तिला वाटत होते.

पण तिला जयताबरोबर टांग्यातून जाताना पाहून माधवरावाच्या एका मित्राने ती खास बातमी त्याच्या कानावर घातली— आणि माधवराव लागलेच घरी आले.

"कुठे गेली होतीस तू ?" त्यानी माणिकला रागानेच विचारले.

ती काहीसुद्धा बोलली नाहीं.

"त्या उनाडटप्पूबरोबर फिरताना लाज नाही वाटली ?"

तरीही तिने प्रत्युत्तर केले नाही.

"साऱ्या लोकाच्या कुटाळकीचा विषय होऊन बसायच आहे का ? चागलच काळ फासणार तू आमच्या तोंडाला—!"

"काय केल रे मी अस ?" रागाने तिचे ओठ थरथरत होते.

"काय अडल होत त्याच्याकडे जायच! अगदीं ताळतंत्र— मर्यादा सोडलीस तू. गुन्हेगार म्हणून शिक्षा झालेल्याबरोबर तूच फिरायला लागलीस म्हणजे लोक थुकतील की माझ्या तोंडावर!"

"खरा गुन्हेगार तू आहेस!" ती त्वेषाने म्हणाली.

"अस्स! जा त्याच्या गळ्यात..."

"चूर!" ती एकदम ओरडली. "अधिक बोलायच कारण नाहीं!"

दोघाचाही चढता स्वर ऐकून माधवरावाची पत्नी तिथे आली. तिला पहाताच माधवरावाना अधिकच चेव आला.

"पुन्हा सागतों—असले थेर चालायचे नाहींत इथे..."

"मला घराबाहेर घालवणार आहेस?" माणिक सतापानें बेभान झाली होती.

पण तिच्या वहिनी मोठ्या धोरणी होत्या क्षणभरही न दवडता त्या माणिकला तिथून घेऊन गेल्या.

"अस काय करता बरं! तुमच्या प्रकृतीकडे नको का पाहायला?"

वहिनींच्या प्रेमळ शब्दामुळें माणिकच्या कोंडलेल्या यातनाचा पूर तिच्या डोळ्यावाटे वाहू लागला, आणि एकाद्या अर्भकाप्रमाणे ती वहिनींच्या कुशींत तोंड लपवून रडू लागली.

वहिनींच्या समजुतदारपणामुळे भावाबहिणीचा बेबनाव घराबाहेर गेला नाहीं.

पण तेव्हापासून माणिकच्या वागण्यात मात्र विलक्षण फरक पडला. घरात ती फारशी कुणाशीं बोलत नाहींशी झाली. बहुतेक वेळ ती आपल्या खोलींतच घालवी. आणि आपल्यापासून दुसऱ्या कुणाला कसलाही त्रास पडू नये याबद्दल ती विशेषच खबरदारी घेऊ लागली.

कालान्तरानें आपली चूक कळून आल्यानतरही माधवरावानी केवळ दुरभिमानामुळें उत्पन्न झालेली तेढ घालविण्याचा प्रयत्न केला नाहीं.

पण त्याच्या वागण्याविरुद्ध त्याच्या पत्नीचे वागणें होते.

एकदा आपले कपडे वाळत घालण्यासाठीं माणिक गच्चीवर निघाली होती. वहिनीसुद्धा तिच्या पाठोपाठ वर गेल्या आणि म्हणाल्या, "अशा का वागता तुम्ही?"

खिन्नपणे हसून माणिक म्हणाली, "वहिनी, माझं काय आहे हो इथें? दुसऱ्याच्या मेहेरबानीवर जगणाऱ्याना भलती मिजास काय कामाची?"

"असं का म्हणता? तुम्ही कुणाच्यासुद्धा मिंध्या नाहीत."

"तेंही दिसलंच की प्रत्यक्ष!" शून्य दृष्टीने दूर कुठे तरी पहात माणिकने उत्तर दिलें.

आणि वहिनींना निरुत्तर व्हावें लागलें.

* * * *

नंतर एक दिवस तिची मैत्रीण घाईघाईनें आली तिच्याकडे.

"साने आज कुठे तरी गावाला गेले." ती म्हणाली.

पण कुठल्याही परिस्थितीला तोंड द्यायची, माणिकच्या मनाची केव्हाच तयारी झालेली होती. तिनें फक्त एक दीर्घ निश्वास सोडला.

"त्यांनीं हें पत्र दिलं आहे." पत्र माणिकच्या हातीं देऊन मैत्रिण निघून गेली.

मोठ्या उत्सुकतेनें पत्र फोडलें तिनें.

"सप्रेम नमस्कार,

घाईनेंच मला पत्र लिहावं लागत आहे. मी आज मुंबईला निघालों असून माझ्या अपेक्षेप्रमाणे सर्व काहीं जमून आलं तर कदाचित् मी पुनः येईनच कॉलेजला. पण तशी आशा करायला फारसा अवकाश नाहीं, बहुतकरून माझ्या

शिक्षणाची परिसमाप्ती झाली असंच मला वाटत आहे यावेळीं तरी.

माझ्या एकंदर वर्तनामुळें तुम्हाला फार त्रास झाला आणि त्याबद्दल मी तुमची मनःपूर्वक क्षमा मागतो. तुमची वागणुक फारच उदारपणाची आहे आणि तुम्ही माझ्या खोलीवर येऊन जी सहानुभूति दाखविली त्यामुळे माझ्या मनातला तुमच्याबद्दलचा आदर शतपट वाढला आहे.

पण त्याच प्रसंगामुळें माझ्या विचाराना वेगळच वळण मिळाल आहे. केवळ अभिमानानें दिवस काढायचे म्हणजे काहीं सोप नाहीं. प्रत्यक्ष कर्तबगारी करून दाखविण त्याही पेक्षा बिकट असल पाहिजे. पण ती हाव मला आता सुटली आहे. माझ्या आयुष्याला कोणतीही दिशा मिळाली तरी तुमची स्मृति माझ्या हृदयातून केव्हाही जाणार नाहीं. आणि ती स्मृति उघडपणे बाळगण्याची पात्रता माझ्या अंगीं आली म्हणजे मी कुठेही असलों तरी तिथून तुमच्याकडे येईन. तोंपर्यंत लोभ ठेवा.

तुमचा,
जयंत साने

* * *

आणि तेंच पत्र तिच्या आशेचा आणि समाधानाचा एकच आधार होता.

आवेगानेंच उठून तिनें तें पत्र ट्रंकेतून काढले पण अनिरुद्ध अशा अश्रुप्रवाहामुळें तिला वाचणें शक्यच नव्हते.

—आणि जवळच कुणीतरी विरहव्याकुल नलिनीचें विरहगीत फोनोवर लाविलें होतें, "पाहू रे किति वाऽट"

माणिकला कळून चुकले की तिला समजण्यापूर्वीच ती प्रीतीच्या प्रांतात येऊन पोंचली होती.

आणि आता मागे फिरणे तिला शक्यच नव्हतें.

त्या भावगीताशीं ती तन्मय होऊन गेली होती. त्यातला प्रत्येक शब्द, प्रत्येक कल्पना तिला आपल्याच मनःस्थितीचे हुबेहूब पडसाद वाटत होते.

त्यातील गूढ आणि करुण भावना प्रत्यक्ष तिच्याच हृदयातून ओसंडू लागली होती—

शांत वातावरणात विलीन होऊं लागलेल्या त्या गीताच्या अखेरच्या लकेरीमध्यें तिनें आपला भारावलेला आर्त स्वर मिळविला,

"पाहिन तोंवरि वाऽऽट !"



# ३

## कवि आणि व्यवहार

ठरलेल्या सख्येपेक्षा अधिक प्रती काढून प्रकाशकानीं आपल्याला चकविलें हें ध्यानात आल्यापासून कविमंडळात एका प्रकारच्या उद्विग्नतेचें वातावरण पसरून गेलें होतें.

—पण त्याना त्याविरुद्ध उपाययोजना करणें जरी शक्य असलें तरी इष्ट नव्हतें, कारण त्या सर्वांचे हितसंबंध प्रकाशकाच्या इच्छेशी निगडित झालेले होते. भांडवलाच्या शक्तीपुढे कवींच्या भावनांचा जोर व्यवहारात टिकाव धरणें शक्य नसतें ही गोष्ट न समजण्याइतके—अभिजात कवी होते तरी—ते मूर्ख नव्हते.

अर्थात् ह्या बाबतींत तरी त्याना एकत्र जमून 'निषेध प्रदर्शक' ठराव—पण तोहि अगदीं गुप्तपणें—पास करून चरफडत बसण्या-पलीकडे काहीं करता येणे शक्य नव्हतें —अर्थात् त्यानीं ठरावही केला नाहींच—फक्त चरफडत बसले.

पण—त्यात एक पदवीधर कवी होते आणि त्याना त्या प्रकाराची इतरापेक्षा जरा जास्तच चीड आली होती. "पदव्याच लाबलचक शेपूट पाठीमागे असल म्हणजे व्यवहार कळतो अस नाहीं . ' हे प्रकाशकाचे छद्‌मी शब्द त्याच्या कानात तापलेल्या तेलाप्रमाणे वारवार पडत आणि तें 'अपमान-शल्य' त्याना फारच व्यथित करी. पण ते कविवर्य अध्यापन क्षेत्रात वावरणारें एक प्रस्थ असल्या-कारणानें इतर "भाववाहक" कवींइतके अश्रुप्रधान— निश्वास-प्रधान—आणि निष्क्रिय असणें शक्य नव्हतें. या घटनेचा ते विधायक विचार करू लागले.

आणि ह्या विचारापोटीं एक व्यावहारिक कल्पना जन्माला आली.

"आमच्या प्रतिभेच्या जोरावर—आमच्या कौशल्यावर आणि आमच्या कीर्तीच्या बळावर भाडवलदार प्रकाशकानीं आपला स्वार्थ साधून वर आम्हाला व्यवहार शिकविण्याचा आव आणावा यापेक्षा अधिक अपमानास्पद गोष्ट ती कोणती अस् शकणार ! अर्थात् या गोष्टीवर विचार, आणि नुसता निष्क्रिय विचार नव्हे—सक्रिय विचार विनिमय करण्याची वेळ आली आहे."

"नुसत्या विचार विनिमयाला आमची हरकत नाही" एक भेद-रट कविमहाशय चाचरतच म्हणाले.

"हेंच ते— याच मनोवृत्तीचा पुरेपूर फायदा भाडवलशाही ('भाडवलशाही' हे शब्द ऐकताच भाई पथात पदार्पण करण्याचा 'सकल्प' केलेल्या एका कवीनें टाळ्या देण्यासाठीं हात उचलले—पण वक्त्यानीं नुसत्या डोळ्यानींच त्याचें अवसान मोडून काढलें.) घेत आहे. आपण सर्वांनी सहकार्य केल तर ह्या स्वार्थसाधू लोकाना

पाणी पाजायला कितीसा वेळ लागणार? आपण सर्वांनी 'एककी लकडी दसका बोजा' अशा रीतीनें वागून शक्य तितक्या त्वरेनें एक काव्य प्रसिद्ध कराव. सुरवातीलाच काहींएक मोबदल्याची अट न ठेवता मी माझ 'भाडवलशाही' हें नवीन खडकाव्य द्यायला तयार आहें. सर्वांनीं खर्च करून हें पुस्तक काढू—आणि (चढ्या आवाजात) घेऊ त्याचा सूड!"

—पण आपली एकतरी कविता छापल्याखेरीज कुणीही खर्चात भागीदार व्हायला तयार होईना. ह्या अडचणीवर उपाय म्हणून "भाडवलशाही व इतर कविता" हें पुस्तक काढावें असे ठरले.

एका प्रकाशकाकडे हिशेबाच्या वहींत आपल्या काव्याच्या ओळी लिहून ठेवल्याकारणानें डिच्चू मिळेपर्यंत, कारकून म्हणून नोकरीवर असलेल्या एका कवीनें एक शका उपस्थित केली, "पण कविताच पुस्तक खपेल का?"

"हीसुद्धा एक लबाडीची भाषा आहे. आपण हें पुस्तक क्रमिक पुस्तक म्हणून लावून घेऊ म्हणजे तरी खपेल?" मूळ कल्पनेच्या जनकाने त्याची शका खोडून काढली.

बैठकीच्या शेवटीं तब्बल चाळीस रुपयाचीं आश्वासने मिळाली आणि ह्या प्रचड आकड्यामुळें पुढारी कविवर्यांची छातीच दडपून गेली.

—पण त्यानीं धीर सोडला नाही. त्याच्या खास मित्रापैकीं, एका छापखान्याच्या मालकाला त्यानीं भरमसाट आमिष दाखवून पुस्तकाचा थोडा बहुत—(म्हणजे सगळाच) खर्च करून पुस्तक तयार करण्याचें काम त्याच्या माथीं मारलें.

पुस्तक चागलें निघायचें म्हणजे चागला कागद, चागली छपाई

(मजकुराची लायकी ही शेवटची गोष्ट) आणखी आत बाहेर उत्कृष्ट चित्रें असलीं म्हणजे बराच कार्यभाग झाला म्हणायला हरकत नाहीं. पैकीं पहिल्या दोन गोष्टी मुद्रकाच्या माथीं मारणें फारसें कठीण नव्हते. पण चित्रे ?

पुनः आला प्रश्न ! कवि महाशयानी सर्व होतकरू चित्रकार धुडाळले. सर्वांना चित्राच्या कल्पना दिल्या, कीर्तीचें—पैशाचें नव्हे—आमिष दाखविलें. पण त्याच्याकडून आलेल्या चित्रानीं पुस्तकावर भलताच परिणाम होण्याची धास्ति वाटल्यावरून त्यानीं तो नाद सोडून "चित्रकार मडळा"कडे धाव घेतली. पण अनुभवान्तीं तें "चित्रकार मडळ" नामधारी असून त्यात चित्रकाराखेरीज सर्व तऱ्हाचे लोक भरून राहिले होते हें त्याना कळून चुकलें.

अखेरीस त्यानी एका धदेवाईक चित्रकाराकडे धाव घेतली. प्रथमच त्यानी 'का !' 'कसे' हें त्या पुस्तकासंबधीं सर्व सागून मग "कलावताची जात एकच. मग ते कवि असोत किंवा चित्रकार असोत .....आता सर्वांनीं भाडवलशाहीविरुद्ध संघटित व्हायाला पाहिजे ....." वगैरे गोष्टी सुनावल्या. पण तो पडला व्यवहारी माणूस.

"किती पैसे द्याल ?" त्यानें विचारलें.

"तुम्ही आम्हाला फुकट द्या कीं ! कलावतानें कलावताची वेळ ओळखली पाहिजे !"

"छे ! तुम्हाला फुकटात नाहीं चित्रं मिळायचीं. पण आधीं तुमच्या चित्राच्या कल्पना सागा मग कमींत कमी काय पडेल तें सागतों."

"अहो पण नाव होईल तुमच."

"नावापेक्षा पैशाला जास्त महत्त्व आहे."

"तें खर हो, पण आम्हाला परवडल पाहिजे ना !"

हो नाहीं करता करता त्यानी त्या चित्रकाराला सर्व चित्र-विषय समजावून दिले.

त्यानें एक रक्कम बोलून दाखविली.

"छे हो ! फारच होतेय्" कविवर्य उद्गारले.

"मग अस करा ! मला काहीच देऊ नका." चित्रकार हसतच बोलला. "हो ! तेवढच समाधान."

अर्थात् ह्या सूचनेचा मनात स्वीकार करून बाहेरून मात्र कविवर्य म्हणाले. " पाहू ! आम्ही काही तुम्हाला अगदीच डोलवणार नाहीं बर ! पण काम मात्र झकास झाल पाहिजे. सूचना मी दिल्याच आहेत तुम्हाला. पाहू कस काय करता तें !"

* * *

भाडवलदारावर चिडून स्वतत्रपणें 'हातपाय हालवायला' निघालेल्या ह्या मडळीला किरकोळ स्वरूपाच्या अडचणीसुद्धा किती कष्टप्रद झाल्या असतील ह्याची कल्पना धदेवाल्याशिवाय इतराना येणार नाही. कारण ज्याच्याकडे जावे तो साशक वृत्तीने पहायचा. सगळी सोगे आणता येतील पण पैशाचे सोग कसे आणणार ?

—पण नशिबानें त्याना लौकरच हात दिला आणि एका हौशी आणि सधन गृहस्थानी त्याना पैशाचे सहाय्य देण्याचे आपण होऊन कबूल केलें 'ज्याच्याकडून काम करून घ्याल त्याना योग्य मोबदला द्या. त्यात मागेपुढें पाहू नका. आणि पुस्तकविक्रीच्या पैशातून आधी माझे पैसे मला द्या आणि जर नफा उरला तर त्यात तुमचा आमचा अर्धा अर्धा भाग' असा तोंडी करार त्यानी पुढारी कवि-

वर्याशी केला आणि ही गोष्ट दोघाखेरीज तिसऱ्या कुणासही मुळीच कळवायची नाही ही एक अट त्यानी घातली.

कविमजकुराना ही दैवी कृपाच वाटली हे सागायला नकोच. आश्वसित चाळीस रुपयापैकी चार रुपये रोख वसूल झाले होते ते त्यानी काही तरी कारण सागून परत केले आणि तो कविमडळातला ठराव आणि मसुदाही फाडून टाकला.

खरे कारण कुणालाच कळू न देता ते पुस्तकाच्या प्रकाशनाची तारीख जवळ आणण्याच्या उद्योगाला लागले. त्या सधन गृहस्थानी पैसे लागतील तसतसे मागून घ्या, असे सागून त्यानी आगाऊ म्हणून शभर रुपये त्याच्या हाती ठेवले

* * * *

लौकरच चित्रकाराकडून चित्रे तयार असल्याबद्दल कविवर्याना निरोप आला. आणि कविमडळाच्या सभासदाना बरोबर घेऊन ते चित्रशाळेत गेले.

मलपृष्ठावरचे तीन रगी चित्र आणि पुस्तकात घालण्यासाठी कविताच्या वर्ण्य विषयाची एकरगी चित्रे, चित्रफलकावर व्यवस्थित रीतीने लावून ठेविलेली त्याना दिसली

चित्रे खरोखरच सुदर झाली होती आणि सर्व कविवर्यानी त्याची स्तुति करायला आरभ केला.

"सदर" आगळ्याशी मधले बोट जोडून एक उद्गारले.

"अप्रतिम" दुसऱ्यानी साथ दिली.

"अगदी स्फूर्तिदायक" तिसरे म्हणाले.

"अगदी जीवत प्रत्यक्ष हालताहेतस वाटत." असे म्हणून चवथे कवि तर कविताच लिहायला बसले.

पण ह्या प्रशंसोद्गारामध्यें पुढारी कवि मात्र मुळीच भाग घेत नव्हते. ते जरा बाजूलाच उभे राहून चित्राच्याबद्दल अधिक विचार करीत असावे असे दिसले.

चित्रकार आपल्या काम करण्याच्या खोलीतून बाहेर आला व त्याने त्या कवीच्या मेळाव्याशी थोडासा हास्यविनोद केला नंतर त्याच्या प्रशंसोद्गाराबद्दल आभार मानून त्या मुख्याकडे वळला

"ठीक आहेत ना ?"

"बरी आहेत." गंभीरपणेच ते म्हणाले

"देऊं का बांधून ?"

"द्या की !" पूर्वीच्याच स्वरात त्यांनी उत्तर दिले.

एकदम आठवण झाल्यासारखे करून चित्रकार पुनः आपल्या आतल्या खोलीत गेला आणि बिलबुक घेऊन बाहेर आला टेबलाशी बसून तो लिहू लागताच कविवर्य त्याच्या जवळ जाऊन पाहू लागले.

"हें हो काय ?' पहिल्याच चित्राच्या पुढे त्याच्या किंमतीची चित्रकाराने लिहिलेली रक्कम पाहून ते उद्गारले

"अहो, माझी नेहमीची किंमत आहे ही"

"पण मी तुम्हाला आधी सांगितलं होतं" कविवर्य थोडेसे करारी पणानेच उत्तरले.

"असं करा ! हें बिल तर घेऊन ठेवा. तुम्हाला काय देता येईल ते आज द्या आणि पुस्तक विकून पैसे आले किंवा तुमची सोय झाली पैशाची, म्हणजे द्या बाकीचे. माझी घाई नाही."

"छे ! छे ! तसं नको, व्यवहार आताच पुरा करून टाकू म्हणजे चांगलं."

"मग द्या की सगळे पैसे. माझ काय ?"

"ते नाही बर का ! मी तुम्हाला सांगितले तेवढे पैसे देणार आहें..." त्यानी पैसे काढून त्याच्यापुढे ठेवीत म्हटले.

ते पैसे उचलून चित्रकार हसतच म्हणाला 'अहो ! पण तुम्हाला नाहीच शक्य झाल तर मी मागणार नाहीं. मग तर झाल ? अगदी पूर्ण फेडीची पावती देईन बर का !"

"तस नको ! हे पैसे तुम्हाला मिळाले आहेत, यापेक्षा अम्हाला नाही परवडायचे. वाटल तर रक्कम तुम्ही लिहिलीय् तेवढी घाला. पण पूर्ण पावती आताच देऊन हा व्यवहार पुरा करून टाका."

"भलतच ? मी सांगितल त्यात फरक नाही होणार."

चित्रे अजून फलकावरून काढलीच नव्हतीं. त्याच्यापैकी एका-कडे पहात एकदम पवित्रा बदलून कविवर्य बोलू लागले.

"काय हो ? मी सांगितल्याप्रमाणे नाहीं केलत हे चित्र ?"

"तुमच्या कल्पनेला धरून आहे ना ?"

"म्हणून काय झाल ? रचना मी सांगितली तशी का नाहीं केलीत ? हे चित्र आम्हाला चालेलस दिसत नाही."

'का बर ? मघाशीच म्हणालात तुम्ही, ठीक आहे म्हणून ! आणि आता काय झाल ?" चित्रकाराचा स्वर मात्र मुळीच बदलला नव्हता.

"अहो, पण ही कुणबीण कोपऱ्यात काढायला सांगितली होती ना ! आणि ते शेतातले बैल खूप दूर अंतरावर पण स्पष्ट घ्यायला सांगितले होते मीं ! बर, तो भाडवलदार मारवाडी कुठ दाखवला आहे ?" कविवर्यांनी गिऱ्हाइकाच्या अधिकारी वाणीचा आश्रय केला होता.

"तस म्हटल तर त्या आडातल पाणी तरी कुठ दिसतय् ? शिवाय, कुणबिणीच दोन मैलावरच घर तरी कुठे काढल आहे ?" चित्रकार गभीरपणे बोलू लागला.

त्याच्या बोलण्यातली खोंच ओळखून कविवर्य म्हणाले, "ते कळत मला. पण चित्र आम्ही सागितलय् काढायला. पैसे आम्ही देणार आहोत. आम्हाला पाहिजे तस नको चित्र करायला ?"

'हें छान विचारलत. काय हो ? तुम्हाला तुमच्या एकाद्या ऐतिहासिक काव्यात वाटेल तसलीं वर्णन एकाद्या पैसे देणाऱ्या प्रकाशकान सागितलीं घालायला तर तुम्ही घालाल ?" चित्रकारानेंही पवित्रा बदलला.

क्षणभर कविवर्य निरुत्तर झाले. पण लगेच जोरानेच म्हणाले, "तो प्रात आमचा आहे."

"मग आमच्या प्रान्तात आम्ही बरे देऊ तुम्हाला वाटेल ती सत्ता गाजवायला !" पुनः तो हसून म्हणाला.

"पण आम्हाला आवडली तरच घेणार आम्ही चित्र. आमच्या सूचनेप्रमाणे झालीं आहेत की नाहीं हें आम्ही अवश्य पाहणार !" कविवर्यांचा स्वर चढू लागला.

इतर कवीची प्रतिभा आता जागृत होऊ लागली होती.

"त्या कुणबिणीच्या डोक्याचे केस काळे कुठे आहेत ? तुम्ही तर ताबडा, निळा आणि वर पाढरासुद्धा रग वापरला आहे" एकाला वाचा फुटली.

"आणि ते बैल तरी कुठ स्पष्ट दिसताहेत ?" दुसऱ्या एकाने फूत्कार सोडला.

"अन् त्या पलीकडच्या डोंगराच्या पायथ्याचीं झाड ? एक तरी

पान स्पष्ट दिसत असेल तर शपथ !” तिसऱ्यानें अक्कल पाघळली.

“अहो पितळेचा ताब्या पिंवळा नको का ? तुम्ही तर खालचा अर्धा भाग काळसरच दाखविलाय्” चवथ्यानें आपल्या निरीक्षक बुद्धीचा विशेष दाखविला.

—आणि चित्रकार मात्र त्याच्या अक्कलेची तारीफ करीत आतल्या आत हसत होता.

त्याचा वाक्प्रवाह जरा ओसरल्यावर तो नम्रपणें म्हणाला,

“खरं आहे तुमचं म्हणणं—तेव्हा असं करा की सगळीच रक्कम द्या आणि चित्र उचला.”

“आम्हाला चित्र पसंत नाहींत ! आम्ही देतों ते पैसे घेऊन पावती देत असलां तर घेतो नाहीतर पैसे द्या परत !” कविश्रेष्ठानी बजाविलें.

“तुम्हाला चित्र नकोत ना ?” चित्रकाराने थोडेसे चिडून विचारले.

“तेवढ्या किमतीत देता तर घेतो.”

“नाही तर नकोत ? द्या लिहून तसं !”

लिहून द्या म्हटल्याबरोबर कवि चमकले.

“आमचे पैसे ?”

“ॲडव्हान्स् म्हणून जमा ! चित्र, दिलेल्या माहितीप्रमाणें आणि छापायच्या कविताना धरून तयार केली आहेत. ती बरोबर की चूक हें ठरविण्याइतकी तुमची पात्रता नाही. थोड्या पैशात पाडता आली तर ती बरोबर आहेत आणि जास्त पैसे पडत असले तर चुकीची असंच ना ?’

"आम्हाला अधिक वाद नको आहे! आमचे पैसे परत द्या!" कविवर्य गर्जले.

"अस्सं काय? ठीक आहे. या पाच चित्रांपैकी एकाची किमत पूर्ण आली आहे—पण तें चित्र तुम्हाला नको आहे तेव्हा .." असे म्हणून त्यानें त्यापैकी एक चित्र फळ्यावरून काढून घेतलें आणि कविवर्यांच्या तोंडापुढें टर्ररकन फाडून टाकले.

तो आवाज ऐकून एक व्यक्ती सावकाशपणे आतून हॉलमध्यें आली—

त्या व्यक्तीला पाहून त्या कविवर्यांचा चेहरा एकदम काळा ठिक्कर पडला आणि दुसऱ्याच क्षणी भोवळ आल्यामुळे ते मटकन खालीच बसले

ती व्यक्ती म्हणजे दुसरें तिसरे कोणी नसून त्या पुस्तकाला आर्थिक सहाय्य करायला स्वेच्छेनें पुढे आलेले गृहस्थ होते.

———

# ४ उन्माद !

"अहो नाव घ्या ! नाव घ्या, नाव" श्रोतृवृंदाने एकच कल्लोळ उडवून दिला. बोलायला उठलेल्या व्यक्तीला क्षणभर अगदी गोंधळल्यासारखे झालें.

"नाव घ्या नाऽव" पुनः गर्जना झाली आणि टाळ्यांच्या कडकडाटानंतर स्टॅम्पिंगचा घडघडाट अधिकच तीव्रतेनें झाला.

आपण चुकून भलत्याच ठिकाणीं तर नाहीं ना आलो ? अशी वक्त्यांना शंका आली असावी, कारण ते चोहींकडे भिरी भिरी पाहू लागले. पण आपल्या आजूबाजूस बसलेल्या परिचयाच्या प्राध्यापक मंडळीला पाहून त्यांची शंका दूर झाली आणि ते पुनः बोलायला आरंभ करणार तोंच—

ठेंचून भरलेला तपकिरीचा बार गॅलरीच्या कोपऱ्यात उडाला आणि त्या स्फोटाचा साहजिक परिणाम म्हणूनच की काय पुनश्च एक गगनभेदी हास्यध्वनि उसळून राहिला.

सहनशक्तीचा कडेलोट झाल्यामुळें, बोलायला म्हणून उभे राहिलेले ते मध्यम वयाचे गृहस्थ 'छे! अशक्य आहे!' असा चेहरा करून आपल्या खुर्चीवर येऊन बसले.

अध्यक्षानी बसल्या जाग्यावरूनच त्याना आग्रह करण्याचा यत्न केला पण स्टँपिंगच्या आवाजात त्याचे शब्द कुणालाच ऐकू आले नाहींत. तरीही त्याचा आशय ओळखून त्या गृहस्थानी मानेनेंच नकार दर्शविला.

अध्यक्षमहाराज पुनः वक्त्याची यादी पाहू लागले पण यादींतल्या गृहस्थानीं एकामागून एक नन्नाचा पाढा नुसत्या करपल्लवीनेंच वाचला.

कुणीही बोलायला पुढें येत नाहींसे पाहून अध्यक्ष बोलायला उठले आणि फिरून एकवार—

"नाव घ्या नाव! नाव घ्या हो नाव" स्टॅंपिंगच्या तालावर श्रोतृवृंदाचा 'कोरस' चालू झाला.

"अरे बाबानो थाबा!" अशा पवित्र्यात दोन्ही हात अभयमुद्रांकित करून, अध्यक्ष महाराज उभे राहिले व गलबा ओसरण्याची वाट पाहू लागले.

पण "नाव घ्या हो नाव"चा जयघोष चालूच होता.

अध्यक्षानीं दीनवाणा चेहरा केला आणि मान खालीं करून फाल्गुनरावाच्या 'पेटंट' अभिनयानें ते सभेकडे पाहू लागले.

क्षणभरच जयघोष बद पडला—आणि लागलेच—"च्च्! च्च्! अरे अरे!" वगैरे चीत्कार प्रतिक्षणीं वाढू लागले.

माणसाच्या सहनशक्तीला मर्यादा आहेच.

"मोठी शरमेची गोष्ट आहे!" अध्यक्षानीं विकारवश होऊन

आपल्या मनातील उद्वेग बाहेर फेकला.

"हो ! हो ! हो हो—..." सभेनें त्याच्या शब्दाचा समाचार घेतला आणि पुनः स्टॅपिंगला आरंभ झाला.

आता मात्र सभा अशक्य ठरवून अध्यक्ष एकदम सभागृहातून चालते झाले.

वास्तविक सभा तेव्हाच संपली होती. पण श्रोतृवृंदाचा आरडा-ओरडाही ह्या अनपेक्षित प्रकारानें एकदम बंद पडला.

मग कुणीसे व्यासपीठावर आले आणि चार उद्वेगाचे शब्द बोलून सभा बरखास्त झाल्याचे सांगून निघून गेले.

ती सभा किर्लोस्कर थिएटरात नव्हती, विजयानंद नाटकगृहात नव्हती किंवा गोखले हॉलमध्येही नव्हती. प्रिन्सिपॉलच्या खास परवानगीने ठरविलेला, कॉलेजच्या सभागृहामध्यें साजरा व्हावयाचा, त्याच कॉलेजातल्या मुलाने लिहिलेल्या एका पुस्तकाचा तो प्रकाशन-समारंभ होता.

श्रोतृवृंदही कॉलेजचे विद्यार्थी आणि विद्यार्थिनी अशा सुशिक्षित-मन्यांचा बनलेला होता. ते सारे निमंत्रित पाहुणे होते. सुशिक्षितांना शोभेसे वर्तन—त्यांच्या मतानें—त्यांनी चालविलें होतें.

आणि हा सर्व प्रकार त्यांच्याच गुरूंच्या—प्राध्यापकांच्या समोर चालला होता. ते कांहींही करू शकले नाहीत म्हणा—की त्यांनीं कांही केलें नाहीं म्हणा—पण प्रकाशन समारंभ असल्या प्रकारातच विसर्जन पावला.

त्या दिवशीं, ठरलेल्या वक्त्यामध्यें एका बुद्धिमान विदूषकाचें नांव घालण्यात आलें होतें. ते विदूषक 'कार्य बाहुल्या'मुळे येऊ शकले नाहींत आणि त्यांच्या विनोदी माकडचेष्टांना चटावलेल्या

विद्यार्थ्यांनी आपल्या निराशेची भरपाई वरील प्रकारानें करून घेतली.

सभा सपली आणि थोड्याच वेळात सभागृह रिकामें झालें. बहुतेक सर्व निघून गेल्यानतर, एक पन्नाशी उलटून गेलेले गृहस्थ सभागृहाच्या बाहेरील, एका त्यातल्या त्यात बाजूच्या कोपऱ्यावरील आपली बैठक सोडून हळू हळू कॉलेजच्या आवाराबाहेर पडले.

* * *

पिंक हॉटेलच्या तळघरातल्या 'स्पेशल' खोलींत पाच सहा विद्यार्थी अगदीं खुषींत येऊन खिदळत होते.

"काय बग्या ! जिरलास कीं नाहीं ? काढ आता फायव्हर" एक दुसऱ्याला म्हणाला.

बग्यानें पाचाची नोट दोस्ताच्या हवाली केली आणि म्होरक्यानें 'बीर' सकट फीस्टची ऑर्डर पोऱ्याला दिली.

"काय लेकाचे उपदेश करतात ! मुकाट ऐकून घेतल आज-पर्यंत म्हणून होय ?" एकानें आरभ केला.

"They should be wise next time." पुढच्या वेळीं तरी त्यानी अक्कल वापरावी' दुसरे बोलले.

"बाकी खर म्हणशील तर त्या साठ्यालाच जिरवायचा होता मला ! काय लेकाचा दिमाख दाखवित होता."

"चार दिवस कॉलेजलासुद्धा यायचा नाहीं. अगदी सेट परसेट जिरलाय् बघ"

"नुसता जिरून नाहीं राह्यला. आदळलाय् चागलाच. त्याला वाटल कीं चार बडीं धेड बोलावून आपल्या तोंडाभोवती घेतले दिवे ओवाळून कीं झाला मोठा लेखक. काय पण प्रकाशन झालय !"

आणि ते वाचस्पति मोठ्यानें हसू लागले.

"भडकाच उडाला न् काय! पण बग्या, लेका तुला मात्र फुकटचा खार बर का! कुणी सांगितली होती पैज मारायला? पुन्हा शहाणा हो!"

"पाच रुपड्यानी माझ काय होणार आहे?" बग्याने पैशाचे पाकीट वाजवीत म्हटले.

"अरे हो! अन् एक गम्मत राह्यलीच कीं सांगायची!" एकदम आठवण झाल्यासारखे एक उद्गारले.

"काय रे?"

"छे! पण नकोच."

"बोल ××× च्या." दुसऱ्यानें त्याचा कान पकडला.

"अरे पण कान सोड की!"

"हं, बोल तर मग"

"ती रे! चार दिवस खपून बिचारीन भाषण पाठ केल नि .." तो हसू लागला.

"खरच बाप्या, निदान तिला तरी बोलायचा चान्स मिळायला हवा होता."

"तर! अरे कुठला धीर होतोय् तिला? फेन्ट येऊन पडली असती स्टेजवर" बापूराव हसतच ओरडले.

"अरे, अतिरथी महारथी खाली बसले तिथे ती कसली पुढें येते—अन् आलीच असती तर..."

"छट्! इतका दुष्टपणा चांगला नाही. थोडस स्त्रीदाक्षिण्य दाखवल असत असत, आपण तरी बुवा" बगाराम म्हणाला.

"वाटलच"

"काय? काय वाटल तुम्हाला?" बगारामानें वेडावीत विचारले.

"काहीं नाहीं !"

" प्रत्यक्ष अगदीं माझी स्वीटहार्ट असती तरी..." बापूराव पुढें बोलू लागले.

"अरे, नाहीं म्हणूनच बोलतोहेस् बाप्या"

"अय्योय्यो !" बापूनें हृदयाशीं हात दाबीत हलकटपणे उद्गार काढले.

आणि बशा घेऊन पोऱ्या आत आला.

बग्याच्या पैजेच्या फीस्टचा शेवट 'बीर'च्या सेवनात झाला. सिगारेटच्या धुराचे फवारे सोडीत ते टोळके रस्त्याला लागलें.

—आणि नतर थोड्याच वेळात अगदी लगतच्याच स्पेशल रूम-मधून, सभागृहाच्या बाहेरूनच सर्व तमाशा पाहणारे ते पन्नाशी उलटून गेलेले गृहस्थही बाहेर पडले. मात्र आता त्याच्याबरोबर दुसरेही एक गृहस्थ होते.

* * * *

"कोण आहे ?" बगाराम सिगारेटची राख झाडीत ओरडला.

पुनः दारावर 'टिक् टिक्' आवाज झाला.

"अहो, तोंड आहे की नाही !" बगाराम चिडून गर्जला.

पुनः टिक् टिक्.

"मरा तर बाहेरच !" त्याने सिगारेट तोंडात कोंबली आणि समोरच्या टेबलावर पाय ताणून दिले.

"बगू !"

विजेचा झटका बसावा तसा बगाराम तडकन् उठून उभा राहिला.

"अरे बगू"

बगारामाने सिगारेट विझवून फेकून दिली, धोतराच्या सोग्यान्चा

पंखा करून धूर खिडकीवाटे बाहेर जाईल तितका घालविला आणि आणि पुनः हाक येण्यापूर्वी दाराची कडी काढली.

"कशी आहे बाबा तुझी तब्येत?" 'बगाराम आणि कंपनीच्या' मागून पिंक हॉटेलमधून बाहेर पडलेले पन्नाशी उलटून गेलेले गृहस्थ आत येता येता म्हणाले.

वडिलाच्या अनपेक्षित आगमनामुळे बगाराम आश्चर्याने त्याच्या-कडे पाहातच राहिला.

"तुझा ताप कसा आहे?" त्या गृहस्थानी अगदी कळकळीनें विचारलें.

"त ..ताप होय?..." बगारामनें चाचरतच उत्तर देण्याचा प्रयत्न केला.

"थाब हं जरा... !" पुनः ते बाहेर गेले आणि बगाराम आऽ वासून त्याच्याकडे पहात राहिला....

क्षणार्धात ते एका पोक्त गृहस्थाना बरोबर घेऊन जिना चढून वर आले ..

"सापडली एकदाची खोली. डॉक्टर, पोरगा भारीच वाळलाय् बरं का !" आत येताना ते म्हणाले.

आणि ह्या डॉक्टरसाहेबाना बगारामनें पूर्वी कधींच पाहिलेले नव्हते.

"अरे असा उभा का ? श्रम होता कामा नयेत फार. बैस. डॉक्टर, पहा बर याला." बगारामला खालीं बसवीत ते डॉक्टर-साहेबाना म्हणाले.

बगारामाच्या तोंडाचा पहिल्या लिपींतला ओ O झाला होता.

डॉक्टर-मजकूरानीं पेशंटच्या चेहऱ्याचें सूक्ष्म निरीक्षण करायला

आरंभ केला, आणि—बगारामाला घाम सुटला.

"अहो, तातडीच पत्र आल याच–मला वाटल झालय तरी काय ? पैसे वेळीं मिळाले ना बगू ? अरे आम्हाला चैन पडेना–म्हटलं पोरगा भलता आजारी– लगेच निघालों झाल" वडिलाचें बोलणे चाललेंच होतें–

आणि डॉक्टरनीं स्टेथास्कोप बाहेर काढला–

बगारामाच्या छातीत धडकी भरली.

"पडा पाहू कॉटवर" डॉक्टर म्हणाले.

बिचारा बगाराम करणार काय दुसरें ?

तपासणी चालू असता डॉक्टर वारवार गभीर चेहरे करीत आणि बगारामचे वडील काळजीनें ग्रासलेल्या दृष्टीनें त्याच्याकडे पहात.

शेवटीं एकदाची तपासणी संपली.

"हें पहा ! याना बिलकूल फिरू देता उपयोगी नाहीं चार दिवस... बर, वेळीच खबरदारी घेतलीत. डोळे पहा–नाडी पहा–घाम पहा कसा सुटलाय् तो"

बगारामला सर्वच प्रकार असह्य झाला होता–तो उठून बसण्याचा प्रयत्न करू लागला. पण त्याच्या वडिलानी त्याला ऊठू दिलें नाही.

डॉक्टर निघण्याची तयारी करीत म्हणाले, "आज देतों ते चार डोसिस् चार चार तासानी द्या, सकाळी मी पुनः येईन पहायला"

दृष्टी बगारामकडे ठेवून वडिलानी डॉक्टरना दारापर्यंत पोंचविले.

"बाबा !"

"काय बगू ?" बाबानी त्याच्या पाठीवरून प्रेमळपणें हात फिरवीत विचारलें. पण त्याचा हात त्याला मात्र कपडयावरून सुद्धा बर्फासारखा गार भासला.

"बाबा ! मला काहीसुद्धा होत नाहीं आता."

"छट् ! तुला कळत नसेल. डॉक्टर काय खोटच सागतात होय ?"

"कोण डॉक्टर हे ?"

"कुणी का असेनात ? तुला काय त्याच्याशी करायच आहे ? माझा विश्वास आहे त्याच्यावर म्हणून आणले मी त्याना."

"पण मी कॉलेजलासुद्धा गेलो होतों आज !" बगाराम त्याची खात्री करून देण्याचा यत्न करू लागला

"मग मला नाहीं तो दिसलास कुठें ?"

"काय ? तुम्ही आला होतात् कॉलेजात ?" बगारामच्या स्वरा-तला भेदरटपणा कुणालाही जाणवला असता.

"तुमचा तो प्रकाशन-समारभ का कायसा होता ना ?" बाबानी शातपणें आपल्या उपस्थितीची खात्री पटविली.

पण बगारामाची मात्र बोबडी वळायची वेळ आली.

"बरं, तें जाऊ दे. आधी बरा हो, मग आहेच कॉलेज."

ते खोलींत येरझारा घालू लागले आणि सर्कशीतल्या सिंहाची दृष्टी ज्याप्रमाणें रिंगमास्तरच्या मागोमाग फिरत असते त्याप्रमाणें बगाराम भेदरलेल्या दृष्टीनें त्याच्याकडे पहात होता.

ते टेबलाकडे गेले. सहजच त्यानी कप्पा उघडला.

पुनः बगारामाला पॅल्पिटेशन्स होऊ लागलीं.

त्यानी आतल्या वस्तू चाळवायला आरभ केला—

—बगाराम रडकुडीस आला.

त्यानी एक सिगारेटचें पाकीट खणातून काढून त्यातून एक सिगारेट काढली अन् विचारलें, "माइल्ड आहे कीं स्ट्रॉग ?"

"माझ्या एका मित्राची विसरून राहिलीय् ती!" बगारामनें बोलण्याचें धैर्य केलें.

"स्ट्रॉग कीं माइल्ड?" पुनः त्यानी शांतपणें विचारलें.

पण बगारामाच्या घशाला कोरड पडली होती.

त्यानी पुनः सिगारेटची पेटी खणात ठेवून दिली, आणि खण बंद केला.

बगारामाचा जीव तात्पुरता खालीं पडला.

* * *

वडील जेवणासाठीं बाहेर गेल्यानंतर बगाराम अंथरुणातून उठून धावतच टेबलापाशीं गेला पण खणाला कुलूप होतें आणि किल्ल्या चुकूनच वडिलानी नेल्या होत्या.

हताशपणें तो खुर्चीवर बसला, आणि त्याच्या डोळ्यापुढून गेल्या महिन्यातील ठळक ठळक प्रसंग जाऊं लागले.

मोठ्या प्रयासानें त्याच्या वडिलानी त्या वर्षाच्या त्याच्या खर्चाची तजवीज करून त्याला कॉलेजला पाठविला होता. त्यासाठी कुटुंबाच्या इतर खर्चाला कात्री लागलीच होती पण त्याच्या दुर्बल प्रकृतीच्या आईनें घरकामाची मोलकरीणसुद्धा कमी करून चिरंजीवाच्या शिक्षणक्रमाचा मार्ग निश्चित करण्यात हातभार लावला होता.

आणि वडिलाच्या मिळकतीला आकड्याची मर्यादा असली तरी बगारामच्या खर्चाचें प्रमाण प्रमाणाच्या बाहेर वाढलें होतें.

ज्यूनिअरच्या वर्षाचा स्वाभाविक हक्क म्हणून "जिमखाना" निवडणुकींत त्यानें कमींत कमी पन्नास पाऊणशेंचा चुराडा केला होता—आणि शेवटीं तो त्यातही आपटलाच होता.

विजयी प्रतिस्पर्ध्याचा सूड घेण्यासाठीं विरोधी कपूचा अग्रणी

बनून, सभाना तमाशाचें स्वरूप देण्याचीही कला त्यानें सशास्त्र हस्तगत केली होती. प्रकाशन-समारभाला मोहरमच्या दगलीचें स्वरूप देण्यातही त्याचें बरेचसें अंग होतें. पण केवळ एक 'गमत' म्हणून विरुद्ध बाजूनें पैज मारून त्यानें पाच रुपयाची 'बीर' पार्टी केली होती.

आणि हा सर्व खर्च आजारीपणातला खर्च म्हणून डायरीत नोंदला गेला होता.

पण कॉलेजच्या उन्मादपूर्ण वातावरणात त्याला ह्या गोष्टींची दुसरी बाजू पाहण्याचें कारणच नव्हतें. सवग लोकप्रियतेला हपापलेले काहीं विदूषक विद्यार्थ्यांच्या विनोदी आणि वैषयिक वृत्तीना 'फुकर' घालण्यातच आपल्या कर्तव्याची इतिश्री मानीत असल्यामुळे "आधींच उल्हास त्यात फाल्गुन मास" अशी स्थिति झाली होती. बगाराम तर त्या वृत्तीचे प्रतीकच बनला होता.

पण वडिलाच्या आकस्मिक आगमनामुळें मात्र तो 'टरकला' होताच पण त्याहीपेक्षा त्याच्या एकदर चमत्कारिक वर्तनामुळे तर तो पुरता ढेपाळला होता.

आणखी पुढे काय शोभा होणार ? या विवचनेंतच तो कॉटवर पडून राहिला. त्याला बाहेर जाण्याचेंही धैर्य झालें नाही—हो कदाचित् दारातच वडील भेटायचे !

थोड्याच वेळात ते परत आले.

"अरे बगू ! डॉक्टरनीं औषध तर दिलच आहे, पण ताबडतोब टॉनिक सुरू करायलासुद्धा सागितल आहे."

पण बगाराम त्याच्या तोंडाकडे पहातच राहिला.

"बीर की फीर कायस मिळत का जवळपास ? तुला ठाऊक

असेलच."

"बीर ? ..??"

"अरे होय 'बीर'च म्हणाले डॉक्टर"

"चौकशी हवी करायला. जाऊन येतों मी." बगाराम उठू लागला.

"छे ! छे ! तू नाहीं हालायच...अरे हो ! आल ध्यानात. पिंक हॉटेलात मिळते का रे ?" त्यानी सहजच विचारलें.

बगारामच्या दृष्टीपुढे काजवे चमकू लागले.

"बहुतकरून मिळत असेल. डॉक्टर अन् मी गेलो होतों तिथें—सध्याकाळीं—तेव्हा चार पाच विद्यार्थी तसलच काहीं तरी घेत होते ." बाबानी कोट चढवीतच आणखी एक बॉब फेकला.

आणि बगाराम पुरता जमीनदोस्त झाला.

दुसऱ्या दिवशीं कॉलेजच्या वातावरणात एकदम खळबळ उडवून देणारी एक गोष्ट घडून आली.

बगाराम आणि त्याचे चार सहाय्यक याना, प्रकाशन-समारभात त्यानी केलेल्या असभ्य वर्तनाबद्दल कॉलेजमधून 'रस्टिकेट' केल्या-बद्दलची नोटीस मधल्या सुट्टीच्या वेळीं प्रिन्सिपलच्या सहीनें नोटीस-बोर्डावर लागली.

—आणि अर्ध्या तासाच्या आत ती बातमी साऱ्या कॉलेजभर पसरून हाः हाः कार उडाला.

अगदीं अनपेक्षित अशा ह्या प्रतिक्रियेमुळे साऱ्या विद्यार्थिवृंदाला धक्काच बसला.

बगाराम पहिल्या तासाला कॉलेजला आला होता पण प्रिन्सिपल साहेबाची भेट घेऊन लागलाच परत जाताना त्याला बऱ्याच विद्यार्थ्यांनी पाहिला होता.

बगारामच्या साथीदाराना बगारामचाच सशय आला आणि लगेच त्याचा मोर्चा त्याच्या खोलीकडे वळला.

पण एकाएकीं 'सीरियसली इल्' झालेल्या बगारामच्या खोलींत डॅाक्टराचा खडा पहारा असल्याकारणानें त्याना परत फिरावें लागलें.

सुट्टी संपल्याची घटा होईपर्यंत टोळया टोळ्यानीं सर्व विद्यार्थि-गण ह्याच विषयावर चर्चा करताना आणि तर्क कुतर्क लढवीत असलेले दिसत होते.

घटा झाली आणि पुनः कॅालेजच्या अभ्यासाला आरभ झाला.

पण पुनः सर्व वर्गातून फिरेलल्या एका नोटिशीने अधिकच गोंधळ उडवून दिला.

'तुमच्याबद्दल आम्हाला काय वाटतें' या विषयावर एक पालक कॅालेजच्या शेवटच्या तासाचे वेळात बोलणार होते आणि अध्यक्ष-स्थान स्वतः प्रिन्सिपलसाहेब भूषित करणार होते.

* * * *

कालच्या प्रकाशन समारभाच्या वातावरणाचा आजच्या व्याख्यानाचे वेळीं मागमूसही नव्हता.

सर्व विद्यार्थ्यांच्या वागणुकीत जशी कांहीं क्रातीच घडून आली होती. नेहमींची हुल्लड ज्याना माहीत होती अशाना तर कुणाच्या तरी मृत्यूबद्दल ही दुखवट्याचीच सभा आहे असें वाटलें असतें.

सभागृहात ठिकठिकाणीं कॅालेजचे प्यून अगर फेलो किवा डेमॅान्स्ट्रेटर्स पोलीसाच्या पवित्र्यात उभे असलेले पाहून मात्र विद्यार्थ्याना कळून चुकलें कीं प्रिन्सिपलनीं एकदम कडक धोरण स्वीकारलें आहे. आणि हकालपट्टी झालेल्या विद्यार्थ्याची आठवण त्याना झालीच.

सर्वांना सभ्यपणानें वागणें भागच होतें.

फार काय, विद्यार्थिनींचें पाचकळ खिदळणेंसुद्धा कुणाला ऐकू आलें नाहीं. एकीनें दुसरीला चिमटा घेतला नाहीं—दुसरीनें तिसरीला पुढें वाकून, टाळी वाजवून आपल्या शेजारीं बसायला बोलाविलें नाहीं की उगाचच इकडून तिकडे जागा बदलीत राहण्याचा आपला अधिकारही कुणी बजावला नाहीं.

मुद्दाम उशीरा येऊन गॅलरींत मुलींच्या मागें बसण्याची मिरास बाळगणारे डॅडीसुद्धा बुटाचा आवाज न करता आधींच वेगळ्या ठिकाणीं स्थानापन्न झाले होते. आणि त्यांच्या ह्या "विचित्र" वागणुकीमुळे मुलींनासुद्धा चुकल्या चुकल्यासारखें वाटत होतें.

बगारामच्या वडिलानी बोलायला आरंभ केला तेव्हा विद्यार्थ्यांना वाटलेलें आश्चर्यही भिवया वर चढविण्याखेरीज त्याना कोणत्याही अन्य रीतीनें दाखविण्याची हिंमत झाली नाहीं.

वक्त्याचा पोषाक अगदीं साधा होता पण विद्यार्थ्यांनी त्याबद्दलही आपलें मत व्यक्त केलें नाहीं.

"तुमच्याचपैकीं एकाचे हे पालक आहेत आणि ते तुम्हाला चार गोष्टी ऐकविणार आहेत." एवढाच परिचय करून देऊन प्रिन्सि-पलनीं वक्त्याना बोलण्याविषयीं सुचविलें.

उपरणें सावरीत बगारामचे वडील बोलायला उठले. पण स्फुट तर राहोच—दबलेले हसेसुद्धा ऐकू आले नाहीं.

"राष्ट्राच्या भावी आधारस्तभानो..." वक्त्यानीं गभीरपणानें आरंभ केला...."तुमच्या बऱ्या वाईट कुठल्याही वृत्तींना 'फुकर' घालण्यासाठीं मी इथें आलों नाहीं. मला तुमच्यामध्यें लोकप्रियता मिळवायची नसल्याकारणानें मला तुमची स्तुती करण्याच कारण

नाहीं. अर्थात् विदूषकी विनोद वगैरेच काय पण तुम्हांला हंसविणारं काहींच माझ्या बोलण्यांत तुम्हाला सापडणार नाहीं.

मागल्या पिढीबद्दल तुम्हाला काय वाटतं तें तुम्ही काल आणि त्याहीपूर्वी अनेक वेळा दाखवून दिल आहे. आज मी तुमच्याविषयीं मागल्या पिढींतल्या माझ्यासारख्या माणसाला काय वाटत हें— तुम्हाला आवडल नाहीं तरी—सागणार आहें.

तुमच्याकडून आम्ही मोठ्याशा राष्ट्रकार्याची अपेक्षा मुळींच करीत नाहीं. तितकी तुमची—निदान तुमच्यापैकीं बहुतेकाची— पात्रता नाहीं हें तुम्हीच दाखवून दिल आहे. कागदाच्या चिटोऱ्याचा कचरा रस्त्यावर अथवा कॉलेजच्या इमारतींत भलत्या ठिकाणीं न टाकता केराच्या टोपलींत टाकण्याची अक्कल तुम्ही दाखविलीत तरी तुम्ही बरच मोठ राष्ट्रकार्य केलत अस मी समजेन.

तुम्हाला पैसा मिळवावा लागत नाहीं. तो, पालक स्वतः कष्ट सोसून आयता तुम्हाला देतात. तुम्ही खर्च कसा करावा एवढ नीट शिकलात तरी फार मोठा विक्रम केल्यासारखा होईल.

शिक्षणासाठीं मिळणारा पैसा चैनीत उडवायचा असेल किंवा मुलींना प्रेझेंट्स् देण्यात खर्चायचा असेल तर तुमचा तुम्ही मिळवा कीं ! परभृतावर मुलीच 'प्रेम' कीं काय तें बसत हें आमच्या वेळीं कुणाला माहीत नव्हत. पण आम्ही आहोंत मागल्या पिढीचे. कदाचित् काळ बदलला असेल.

तुम्ही आमच्या पिढीबद्दल तिरस्कार बाळगता, आणि आमच्याच श्रमावर ह्या उन्मादक स्वप्नरंजनात दग झालेले असता. तुम्हाला विचार—स्वातंत्र्य आहे. पण त्याचवेळीं आमच विचार—स्वातंत्र्य, तुमची मासिक एम्. ओ. बद करून आम्हीं पटवून दिल तर ?

तुमच्या अंगात नीति-धैर्य कितीस आहे हें आज स्पष्ट दिसलच. कालचा समारभ आणि आजची सभा यातला फरकच सागतो आहे. खालीं पडलेल नाक कदाचित् तुमच्यापैकीं काहीं, 'बीर'च्या बाटलीनें उजळविण्याचा प्रयत्न करतील. पण तुमची लायकी काय आहे तें तुमच तुम्हीच लौकर ओळखलत तर अधिक चागल.

दोन चार दिवसात मी जें काहीं पाह्यल त्यावरून तुमच्या शिक्षणासाठीं जो पैसा आम्ही खर्चतों तो पाण्यात जातो—अगदीं अनाठायीं जातो अस मला वाटू लागल आहे. काहीं विद्वानानी तुमच्यामधील हलक्या वृत्तींना भडकविल आहे—वाईटाचा पगडा मनावर तेव्हाच बसतो. पण थोडी कल्पना करा—तुमची पैशाची रसद तुटली, पालक शहाणे अन् कडक बनले तर? कुठे राहतील तुमच्या मिजाशी? तुमच प्रेम? तुमच काव्य? तुमच्या आकाक्षा?"

ते अर्धा तास त्याच स्वरानें बोलत होते. पण कुणालाही नुसती शिकसुद्धा आली नाहीं. खवळलेला जनसमूह मशीनगनच्या दर्शनाने जसा थडा होतो तसाच चमत्कार केवळ प्रिन्सिपलसाहेबाच्या करड्या नजरेनें घडवून आणला होता. त्यानीं व्याख्यान ठरविलें होते आणि त्यात व्यत्यय आणण्याची कुणाचीही छाती नव्हती.

शेवटीं वक्ते म्हणाले, "मला एवढच सागायच कीं, हसा, खिदळा पण असभ्य आणि हलकट बनू नका." त्याचे भाषण सपलें आणि लागलेच प्रिन्सिपलसाहेब बोलायला उठले.

"मला माहीत आहे" ते म्हणाले, "की तुम्हाला खऱ्या गोष्टी ऐकून घ्यायची सवयच नाहीं. नुसत्या स्तुतीला आणि बाष्कळ विनोदाला लाचावलेले लोक आहात तुम्ही. पण एकदा तरी, लोकाना तुमच्या माकडचेष्टाबद्दल काय वाटत तें तुम्हाला कळाव ह्याच हेतूनें

आजच्या आपल्या सन्मान्य पाहुण्याना मी मुद्दाम आमत्रण दिल. ते स्वतः तुमच्यामधील एका उनाडटप्पूचे वडील आहेत. आपल्या मुलाला मोठ्या आशेनें आणि उमेदीनें उच्च शिक्षणासाठीं इथे पाठवून पस्तावलेले एक गृहस्थ आहेत.

स्वतःच्या आचरणानें त्यानी आज एक धडा घालून दिला आहे. आज रस्टिकेट झालेल्यामध्येंच त्याचा मुलगा आहे. त्यानी स्वतःच त्याच्या अपराधाच माप त्याच्या पदरात घातल आहे.

त्याच्याप्रमाणेंच सर्व पालक आपल्या पाल्याच्या बाबतींत जागरुक राहतील तर तुम्हाला मर्यादेनें वागणच भाग पडेल. पण सर्वांनाच तें शक्य नसत, ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

आणि तुमच्या हीन मनोवृत्तींचा, बाष्कळपणाचा कळस झाला तेव्हा आम्हाला करण अवश्य होत तें आम्ही केलच आहे.

पण पुनः एक वार मी तुम्हाला धोक्याची सूचना देतों. तुम्ही आपला दृष्टिकोन बदलून आपल्या कर्तव्याची स्मृति नेहमीं बाळगून वागाल अशी मला उमेद आहे. आणि तशी संधि सर्वांना मिळावी म्हणून आज ज्याना शिक्षा केली आहे त्याच्यासह सर्वांना मी क्षमा केली आहे. ह्या गोष्टीपासून तुम्ही योग्य तो बोध घ्याल अशी मला आशा आहे.”

---

# ५ नवी दृष्टि

सकाळची पूना एक्स्प्रेस साडेअकरा वाजता पुण्याला येते. त्या गाडीनें येणारा मनुष्य सदाशिव पेठेंत बारा वाजल्याशिवाय येऊ शकत नाहीं हें पक्कें ठाऊक असूनसुद्धा, दहा वाजल्यापासून शान्ता जवळपास एखादा टांगा गेल्याचा आवाज आला कीं खिडकीशीं येऊन उभी राही, आणि 'नाहीं' म्हणून खात्री झाली कीं फिरून आपल्या घरकामाला लागे.

शान्ताचा विवाह होऊन आज वर्ष होऊन गेले होतें, आणि लग्नानंतर मधुकराची व तीची गाठ मुळींच पडली नव्हती. शान्ता मधुदादाची अगदीं उत्सुकतेनें वाट पहात होती.

"आहेऽऽबुवा ! आज दादा येणाऽऽर." शान्ता चटकन् मागें वळली. गोपाळराव, शान्ताची 'स्वारी', भाजीची पिशवी रिकामी करीत होते.

"यूऽऽ"

"यूऽऽ काय ? मी माजर आहे वाटत ! हज्जारदा सागितल. .."

"हाज्जारदा ऐकल. म्हटल, तिकडे खिडकीत तासभर उभी राहिलीस तरी गाडीची गति काही वाढायची नाहीं. इकडे भाजी करपल्याचा वास येतोय्."

"ह."

"ह काय ? उतर ना ती खाली !"

"उतरते ना–" शान्ता मानेला हिसडा देऊन एक पाय उडवीत स्वयपाकघराकडे निघाली. पण गोपाळ तिच्या आधीच आत गेला व त्यानें चटकन् भाजीची पातेली उतरून ठेवली.

"स्वयपाकघरात ढवळाढवळ करायची नाही म्हणून सारखी ओरडतेय् वर्षभर, पण कुणी ऐकेल तर शपथ."

"जितक्या वेळा तुझ ऐकल तितक्या वेळा करपलेली भाजीच मला खावी लागली–"

"डबा आणावा खाणावळीतून, माझ्या हातच आवडत नसल तर. मलासुद्धा कटाळा आलाय अगदी."

"आणीन बर––"

"आणावा बर्रऽ"

"हो, मलाहि कटाळा आला आहे."

"माझा ना ? ऊघडच दिसतय्."

"तुझ्याशी भाडत बसायचा."

"सुरवात कोण करत ?"

"तूच."

"मी ?"

"हो तूच ! माझ्यासारख्या गरीब माणसाशीं गाठ पडली म्हणून

ठीक आहे. नाहीं तर ..”

“हो! हो तर! काय पण गरीब!! अगदी तोंडावरची माशी-सुद्धा हलायची नाही ..”

“बर, बर!”

शान्ता चटकन् टेबलाकडे गेली आणि आरसा घेऊन तो गोपाळच्या पुढें करून म्हणाली,

“पहायच जरा, किती गरीब दिसायच तें! अलेऽअले!! काय पण गलीबपणा—”

“चल! किती वात्रटपणा करतेस! मला कुकुबाळाप्रमाणे भरवायच ठेवलयूस् बाकी —”

“मग भरवू का आता?”

“मातोश्री! थट्टा पुरे झाली आता .. (साडेदहाचा ठोका). ऑफिसात जायला उशीर होणार आज...”

“होऊं द्या एक दिवस.”

“वाढतेस की नाही?”

“नाहीं वाढत.”

गोपाळ तडक स्वयपाकाच्या खोलींत गेला आणि हाताशी सापडलें तें घेऊन त्यानें आपलें ताट वाढून घ्यायला आरंभ केला. शान्ता मान वाकडी करून, कमरेवर हात घेऊन हसतच त्याची धादल पहात होती. वाढून घेताना गोपाळच्या हातावर गरम गरम आमटी सांडली व त्याचा हात थोडासा भाजला.

“हे पहावं! ज्याच काम त्याला. कशाला करावी धादल? मी वाढते आता...”

“खबरदार पुढे येशील तर—पळी आहे माझ्या हातात.” गोपाळ

पळी जमिनीवर आपटीत रागानेंच म्हणाला. शान्ता उंबरठ्यातच तळ देऊन बसली.

"इतकं रागवायला नको होत काहीं"

"तुला कुठ पर्वा आहे मला राग आला तरी!"

"बर, राहिल माझ!" शान्ता ओशाळून म्हणाली. अवघ्या चार मिनिटात गोपाळचें जेवण आटोपतसुद्धा आलें.

"आता तरी मी वाढू का?"

पण गोपाळानें जोरानें पळी जमिनीवर आपटली. शान्ता उठून फिरून खिडकीशीं जाऊन उभी राहिली. थोड्याच वेळात गोपाळ हात धुऊन कपडे चढवू लागला.

"म्हटल, आज गेल नाहीं तर नाहीं का चालणार?"

"गेलच पाहिजे."

"मग लौकर तरी यावं घरीं."

"छट्! अगदीं नाहीं. ऑफिस सुटल्यावर सिनेमाला जाऊन येणार आहें."

"कधीं नाहीं तो दादा येतोय् आज, आणि आजच सिनेमा अडून बसला असेल अगदीं!" शान्ता बाहेर पहातच म्हणाली.

"मधु आज ना उद्या भेटेल, पण सिनेमा मात्र चुकला की चुकलाच."

शान्तानें उत्तरादाखल एक निःश्वास सोडला.

गोपाळ तिच्याजवळ गेला आणि तिचे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन म्हणाला, "कध्धीं नाहीं तो मधू येतोय् आज. निदान त्याला तरी करपलेली भाजी वाढू नको; नाहीं तर तो म्हणेल, कीं आमच्या घरीं भाजीसुद्धा चागली करीत नाहींत म्हणून."

शान्तानें आपले हात हिसक्यानेंच सोडवून घेतले. तिच्या रागाचा पारा नॉर्मलच्या वर गेला होता.

"पुरें झाल ! ठाऊक आहे दादाबद्दल मोठ हें आलंय् तें. मला नाहीं असल खोट हें आणता येत. त्याला करपलेली भाजी वाढीन नाहीं तर उपाशी ठेवीन, आपल्याला काय त्याच ?"

"खरच का, गोपाळ, मला उपाशीं रहाव लागणार आज ?" मधुकर दार उघडून आत येतच म्हणाला

गोपाळ पळतच कपाटाकडे गेला आणि छोटा कॅमेरा हातात घेऊन म्हणाला, "स्टेडी प्लीज् शान्ते ! असल Expression साऱ्या जन्मात नाहीं पाहिल मीं. वन् ! टू ! थ्री ! !" पण गोपाळने चपळाई केली नसती तर कॅमेऱ्याचा चक्काचूर झाला असता

"वाऽऽग ! कॅमेऱ्याला पैसे दिलेत." गोपाळ कॅमेरा कपाटात ठेवीत म्हणाला. शान्ता About turn करून तडक स्वयपाकाच्या खोलींत गेली. गोपाळ मधुकरच्या कानात काहींसें बोलून ऑफिसात जाण्यासाठी बाहेर पडला.

"दादा, केव्हा आलास रे तू पुण्यात ?"

"आजच ! रात्रीं निघालों मुंबईहून."

"अस्सं ! मी किनई सारखी वाट पहातेय् तुझी–"

"का ग ?"

"उगीचच ! सबंध वर्षात भेटला नाहींस." शान्ताच्या डोळयाना पाणी आलें. मधुकर तिच्याकडे पहात काहीं वेळ स्वस्थ बसला आणि नतर म्हणाला,"मला वाटल होत, कीं तुझा स्वभाव बदलला असेल म्हणून. पण होतीस तश्शी आहेस अजून. किती हळव मन तुझ हें !"

"तुझं म्हणणं खरं आहे!" शान्ता खालीं पहात म्हणाली. "पण नाइलाज आहे माझा त्या गोष्टीला."

"बरं, तें जाऊं दे. मला भूक लागलीय्" मधुकर कोट काढीत म्हणाला.

"थांब जरा! दुसरी भाजी करतें."

"भाजी नसली तरी चालेल—"

"अऽह! तें नाहीं चालायचं. आत्ता करते बघ! आज करपली जरा भाजी."

"मला करपलेली वाढ!"

"हें काय रे?"

"हें अन् तें मला नाही ठाऊक! गोपाळला वाढलीस तीच मला वाढ..."

शान्ताला काहींच उत्तर सुचेना.

"एकाच माळेचे मणी!" ती म्हणाली.

"पण एक मणी तुझ्यापुढे उभा आहे. अन् दुसरा कुठला? ऑफिसात गेलाय् तो की काय!" मधुकर हसतच म्हणाला. शान्ता-लाही हसूं आलें.

"बरं, चल वाढते."

मधुकर पानावर बसला. शान्ता त्याला वाढूं लागली.

"लग्न झाल्यानंतर मुलीचा आपल्या माणसावर मुळींच हक्क रहात नाही का रे?"

"भलतंच! लग्न म्हणजे आपलं माणूस ताब्यात मिळायची Final Decree."

"थट्टेशिवाय बोलणं नाहीं मुळीं! मी म्हणते माहेरच्या माणसा-

बद्दल, तर तू काय ! आईन काय माझ्या पत्राच उत्तरसुद्धा वेळी पाठवू नये का ?"

"हे पहा, शान्ते ! थोडा आळस होतो खरा माझ्याकडून, अन् आईला वेळ मिळाला पाहिजे ना !"

"मी आपली वेड्यासारखी वाट पहात रहाते"

"यापुढे आळस नाहीं करणार. पण शान्ते, तुला एक प्रश्न विचारू का ?" मधुकर जरा गभीरपणाने म्हणाला.

शान्ता त्याच्याकडे पहातच राहिली.

"विचारू का ?"

शान्ताला काही कल्पनाच येईना. "कसला प्रश्न ?" तिनें विचारलें.

"पण अगदी खर आणि मनापासून उत्तर दिल पाहिजे"

"हो देईन" शान्ता म्हणाली.

"पहा बर ! उत्तर द्यायच नसेल तर तस साग पण खोट मात्र सागू नकोस"

शान्ता अधिकच घोटाळ्यात पडली.

"शान्ते, तू सुखी आहेस का ?" मधुकरनें अगदीं गभीरपणें तिच्या डोळ्याकडे दृष्टि लावून विचारलें

शान्ताला ह्या प्रश्नाचें आश्चर्य वाटलें. तिनें तोंड बाजूला फिरविलें. मधुकर तिच्या मनोविकाराचे बारकाईने निरीक्षण करीत होता.

"तू सुखी आहेस ना ?"

शान्ता खाली पाहू लागली.

"तुझ्या तोडून तू सुखी असल्याच कळल तर मला किती आनद वाटेल !"

"काहीं तरीच विचारू नकोस." शान्ता खालीं पहातच म्हणाली

"यात काहीं तरीच काय झाल?"

"तुझ्या प्रश्नाच उत्तर काय द्यायचं? सुखी नसायला काय झालं? मला काय कमी आहे?" ती शान्तपणें म्हणाली. तिनें मधुकरकडे पहाण्याचा प्रयत्न केला. पण मान वर करताच तिच्या डोळयातील अश्रू मधुकरला दिसले.

"मग हे आनदाश्रु आहेत अस समजू ना?"

शान्ताला चमत्कारिक होऊन गेले.

"बर, सगळ आटोपून ये; मग बोलत बसू." मधुकर बाहेरच्या खोलींत जाऊन आरामखुर्चीवर वाचीत पडला.

थोड्याच वेळात शान्ता आपले जेवण आटोपून व भाडीं वगैरे मोलकरणीसाठीं तयार ठेवून बाहेर आली, आणि मधुकरच्या शेजारीं एका खुर्चीवर बसली. इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर मधुकरनें फिरून गभीरपणा धारण केला.

"शान्ते!"

"काय दादा? फिरून काहीं मघाच्यासारख विचारायच आहे कीं काय?"

"छे ग! पण खरं साग बरं का, मघाशीं तुझ्या डोळयात पाणी का आल?"

"उगाचच."

"उगाच कस येईल?"

"सागूच का तुला?"

"अर्थात्!"

"तुझ्या प्रश्नामुळं काहीं मला वाईट वाटलं नाहीं. पण आज

कीं नाहीं माझ्याकडून चूक झालीय एक. वाढ म्हणत असताना वाढलं नाहीं मीं आज. अन् भाजी केवळ माझ्या निष्काळजी-पणामुळे करपली. जवळ जवळ उपाशीं जायचय ऑफिसात. माझ्या मनाला लागली ती गोष्ट. तू बोलत होतास, मी पण बोलत होतें, पण माझ्या मनात राहून राहून ती गोष्ट येत होती." शान्ता जवळ जवळ रडण्याच्या बेतात आली.

"हात्तिच्या! गोपाळची कल्पना नाहीं तुला. तो तर केव्हाच विसरूनसुद्धा गेला असेल ती गोष्ट. बाकी अलीकडे स्वभाव बदलला असेल तर कुणाला ठाऊक. पण नेहमीं अशीच का वागतेस त्याच्याशीं?"

शान्ता अगदीं ओशाळून गेली.

"तस असल तर विलक्षणच म्हणायच." मधुकर पुढें म्हणाला, "कारण हा नेहमींचाच प्रकार असला तर दोघाच्याही अंगवळणी पडून त्याच काहींच वाटत नसेल आता."

शान्ता वेड्यासारखी त्याच्याकडे पाहू लागली.

"—करपलेली भाजी वाढीन नाही तर उपाशीं ठेवीन, आप-ल्याला काय त्याच?" मधुकर शान्तेची हुबेहुब नक्कल करीत म्हणाला. "शान्ते, तुझी गमत वाटली मला. तेच शब्द जरा निराळ्या तऱ्हेन बोलली असतीस तर नसत का चालल? थोडीशी तरी मर्यादा ठेवायला नको का? हें नाहीं बुवा आपल्याला पसत. बाकी तोसुद्धा आहे अगदीं बेरड! चुकल बर का, शान्ते—पण माझा आधींपासूनचा दोस्त आहे—त्याला काहींसुद्धा वाटायच नाहीं. तो अगदीं आपल्या मनाप्रमाण वागेल; कारण सहसा तो आपल्याकडून चूक होऊच द्यायचा नाहीं."

"म्हणजे चुकत आमच बायकाचच नेहमीं !"

"यात असल्या प्रश्नाचा काय संबंध ?"

शान्ताला काहीं उत्तर देता येईना.

"आजच्यासारख पूर्वी कधी झाल होत का ?"

शान्ता खालीं पहात राहिली.

"म्हणजे नेहमींचाच प्रकार दिसतोय्. बरं, आजच्यासारख नतर वाईट वाटत का तुला नेहमीच ?"

शान्ता वर पाहीनाच, पण तिचे डोळे मात्र पुन्हा भरून आले.

"हें पहा, शान्ते ! मी काहीं तुला रडवायला आलों नाहीं इथे. पण नेहमी भाडायच आणि नतर रडत बसायच हें चागल का ? भाडणालाहि किमत नाहीं अन् रडण्याला तर त्याहूनहि नाहीं."

शान्तानें डोळे पुसले आणि अगदीं स्वस्थ बसली. मधुकर खोलीत येरझारा घालू लागला. त्याच्या मनात कसले तरी विचार चालले होते. मध्येंच तो शान्ताकडे वळून म्हणाला,

"आज केव्हा येणार आहे गोपाळ ?"

"ऑफिस सुटल्यावर सिनेमाला जाऊन."

"अन् तें तुला खर वाटल ना ?"

"म्हणजे ?" शान्ता फिरून घोटाळ्यात पडली.

" म्हणजे एवढच कीं एक वर्ष त्याच्या सहवासात घालवूनसुद्धा तुला त्याचा स्वभाव काही कळला नाहीं !"

शान्ता केविलवाण्या मुद्रेनें मधुकरकडे पाहू लागली. ती त्याच्याकडून सहानुभूतीची अपेक्षा करीत होती. मधुकरालाही थोडें वाईट वाटलें.

"हें पहा, शान्ते ! माझं म्हणणं चूक असलं तर तसं सांग मला. पण मी चांगल्याकरताच बोलतोंय् !"

"मला चिडवावं का एकसारखं" शान्ता बालिशपणे म्हणाली.

"तू चिडतेस म्हणून !"

शान्ता निरुत्तर झाली.

"बरं, झालं तें गेलं–" मधुकर शान्तपणें म्हणाला, "पुढे तरी असं होणार नाहीं अशी खबरदारी घे. गोपाळचीसुद्धा हजेरी घ्यायला हवी..."

"अं हं !"

"कां ?"

"मी सांगतें म्हणून."

"बरं ! या क्षणापासून तुझ्या वागण्यांत सुधारणा दिसली तर नाहीं जाणार गोपाळच्या वाटेला, आहे कबूल ?"

शान्तानें मानेनेंच कबुली दिली.

खालीं सायकल वाजल्याचा आवाज झाला. लागलीच जिन्यावर पावलें वाजलीं. गोपाळ 'येरि मोहि जाने दे' ही चीज गुणगुणत आंत आला. शान्ता चटकन् उठून स्वयंपाकखोलीकडे जाऊं लागली. गोपाळ तिच्या पावलांकडे पाहून म्हणाला, "क्विक् मार्च...लेफ्ट्– राइट् .. left right (आणि ती दरवाजापर्यंत जाताच) halt ! अग हॉल्ट म्हणजे थांब !"

शान्ता थांबली. गोपाळला तिच्या शान्तपणाचें, विशेषतः न चिडून जाण्याचें आश्चर्यच वाटलें. तो तिच्याकडे टक लावून पाहूं लागला. शान्ताच्या चेहऱ्यांत कांहींसुद्धा फरक झाला नाहीं. गोपाळ मोठ्यानें हसला. शान्तानें आपलें हसे दाबून टाकण्यासाठीं आपले

ओठ घट्ट दाबून धरले. गोपाळनें शान्ताच्या उजव्या हातात एक लहानशी सुदर डबी दिली आणि आपल्या हातानेंच तिची मूठ बद केली. गोपाळ एक पाऊल मागें सरला आणि त्यानें शान्ताला अगदीं लष्करी शिस्तीचा सलाम केला.

शान्तानें ऑफिसरप्रमाणें सलाम नुसत्या मानेनेंच परत केला व तडक स्वयपाकघरात निघून गेली.

"आश्चर्य आहे बुवा !" गोपाळ मधुकरला हसतच म्हणाला.

"एवढ्यावरच संपल नाहीं, आता तुझी पाळी आहे. पण तुझी तपासणी in camera न करता अगदीं उघडपणे करायची ठरविली आहे."

"ठीक आहे." गोपाळ कपडे उतरीत म्हणाला.

शान्ताने कॉफीचे कप टेबलावर आणून ठेविले. सर्वांचें काफीपान झाल्यावर थोडा वेळ किरकोळ गप्पा झाल्या. नतर मधुकर म्हणाला, "मिस्टर गोपाळराव ! आपल्याविरुद्ध सौ. शान्ताबाई याची फिर्याद आली आहे !"

"काय गुन्हा आहे ?" गोपाळ म्हणाला.

"दादा !–"

"कोर्टाच्या कामात अडथळा चालणार नाहीं."

"पण–"

"पण बिण काहीं नाहीं. गोपाळराव ! तुम्ही वेळ काळ न पहाता शान्ताबाईंना चीड येईल असं वर्तन करीत असता. पुरावा भक्कम आहे ! आपल काय म्हणण आहे यावर ?"

"मी गुन्हा कबूल करतों." गोपाळ मान वाकवून म्हणाला.

"मला फिर्याद काढून घ्यायची आहे. वास्तविक मीं फिर्याद दिलीच नव्हती—" शान्ता गोपाळकडे पहात म्हणाली.

"बर, शिक्षा काय ठरली आहे?" गोपाळ मधुकरकडे पाहून म्हणाला.

"फिर्यादी सांगेल ती!" मधुकर म्हणाला.

"चांगला न्याय!—" गोपाळ उद्गारला.

"दादा! थट्टा पुरे झाली आता, आणि तस म्हटल तर दुसऱ्या बाजूच म्हणण ऐकून घ्याव लागत ना? नुसता गुन्हा कबूल करण्यात काय अर्थ आहे? आधीं गुन्हा करावाच का?"

"तस असल तर मी गुन्हा नाकबूल करतों!"

"सिद्ध करा तें!" मधुकर म्हणाला.

"बर आहे. आता जरा प्रोसिडिंग थांबवाव असा माझा अर्ज आहे. मीं तुम्हाला एक लहानशी गोष्ट सांगणार आहें. तीच माझी कैफियत. त्यानंतर काय तो निकाल देण योग्य होईल."

"कबूल आहे!" मधुकर म्हणाला.

गोपाळनें खुर्ची पुढें ओढली.

"नीट ऐका, बर का! शान्ते, विशेषतः तू नीट लक्ष देऊन ऐक! एक होता मधुकर, चांगला मुलगा बरं का—अगदीं मनमिळाऊ, वगैरे वगैरे..."

मधुकर बसल्या जागीं चुळबुळ करू लागला.

"त्याला शान्ता नावाची चारपाच वर्षांनीं लहान एक बहीण.."

"हीच का गोष्ट? आम्हाला टाऊक आहे!..." शान्ता म्हणाली.

"मुळींच ठाऊक असण शक्य नाहीं!" गोपाळ म्हणाला.

मधुकरनें टेबलावर पेन्सिल टक् टक् वाजविली. शान्ता गप्प बसली. गोपाळनें पुढें सुरवात केली,

"बहीण भावापेक्षा लहान असल्यामुळे दोघहि एकमेकाशीं अगदी मोकळेपणान वागत. हीच जर का बहीण मोठी असती तर तितक मोकळेपणाने वागण शक्य झाल नसत, कारण निसर्ग. भाऊ किती जरी शिकलेला किंवा हुषार असला तरी तो मोठ्या बहिणीला बहुधा 'दीड शहाणा' वाटत असतो ! असा अनुभव आहे बऱ्याच लोकाचा !"

"अस्स का?" शान्ता म्हणाली, "विचारल पाहिजे एकदा वन्सना !"

"खुशाल विचार, बर का. हो, पुढ काय झाल—की त्याच्या गावात नव्हती मुलींची इंग्रजी शाळा, पण मुलाच हायस्कूल होत, बर का ! अन् शान्ताची तर इंग्रजी शिकायची इच्छा. अन् तिच मराठी शिक्षण झाल्यावर मधुकरने तिला इंग्रजी शिकवायच कबूल केल. पण त्याच वर्षी तो झाला मॅट्रिक. तरी पण दर सुट्टीत घरीं आल्यानतर शान्ता त्याच्याकडे शिकत असे त्यामुळे चार वर्षात यत्ता झाल्या तीनच. पण एवढ खर कीं, शान्ताचा निश्चय अन् चिकाटी वाखाणण्यासारखीं आहेत—होतीं—खास !"

"शान्ते ! हरभऱ्याच्या झाडावर चढू नको, बर का—" मधुकर म्हणाला.

"इकडे काय झाल कीं मधुकर गेला पुण्याच्या एका कॉलेजात. तिथे त्याची अन् एका मुलाची दोस्ती जमली. तो मुलगा साधारणच, बरं का—आपला इतर मुलासारखाच ! विशेष म्हणण्यासारखा काहीं गुण नव्हता त्याच्यात; पण दोघाची दोस्ती जमली खरी."

"आता कथानकाला खरा प्रारभ होतोय्, बरं का शान्ते!" मधुकरनें शान्ताला सूचना केली.

"मधुकर! आता जर का माझ चुकल तरच मध्यें बोल, कारण Link तुटते—"

"Link जुळलीच आहे कुठं अज्न?" मधुकर हसतच म्हणाला.

"अरे, त्याच्याकरताच तर प्रयत्न चाललेत! हो, चार वर्षांत दोघेहि बी. ए. झाले, दोघाचाहि परिचय बराच होऊन दोघाच्याहि स्वभावाची वगैरे माहिती एकमेकाना झाली. In fact दोघेहि अगदीं जीवश्च कठश्च स्नेही झाले. पण अलीकडे मधुकर आपल्या दोस्ताकडे निराळयाच दृष्टीनें पाहू लागला होता! कारण—"

"कारण मधुकरची बहीण शान्ता...बर का!" मधुकर म्हणाला.

"इश्श!" शान्ता उद्गारली, "हीच का गोष्ट! पुढे नको सागायला, मी जातेंच मुळीं!"

"इतकी उतावळी होऊ नकोस, शान्ते. जरा थाबशील कीं नाहीं! अजून खरी मजा यायची आहे–" गोपाळ म्हणाला. शान्तेला स्वस्थ बसणें भाग पडलें.

"मधले डीटेल्स मला ठाउक नाहीत, पण परीक्षा झाल्यानतर मधुकरच्या आग्रहावरून त्याचा दोस्त त्याच्याकडे रहायला गेला काहीं दिवस. तेव्हा काय झाल कीं... !"

"गेल्या मार्गेसरात गोपाळच अन् शान्ताच लग्न झाल!" मधुकर शान्तेकडे पहात म्हणाला.

शान्ताचा चेहरा अगदीं ताबडालाल होऊन गेला.

"आणि आता कथानकाचा पूर्वेतिहास संपून महत्त्वाच्या भागाला आरभ होणार आहे. मधुकर, तुझ व्हायच आहे लग्न अजून, तेव्हा

तुला विवाहित आयुष्याची खरी कल्पना असणं शक्य नाहीं. आजकालच्या लघुकथावरून कल्पना करायला जाशील तर अगदीं तोंडघशी पडशील. आमचच उदाहरण घे. आज सकाळीं एखाद्या मनुष्यान आमच भाषण अन् वागण पाहिल असत, तर त्याला आमच्या सुखाचा हेवा वाटला असता. खर सागायच म्हणजे 'लघुकथा'च्या घर्तीवरच पतिपत्नींच संभाषण (Conversation) आमच्या अंगवळणीं पडून गेलय. म्हणजे त्यात काहीं वाईट आहे असं मी म्हणत नाहीं—पण त्याच खर स्वरूप जरा निराळ आहे."

शान्ता आणि मधुकर आता मात्र खरेंच लक्ष देऊन गोपाळचा प्रत्येक शब्द ऐकू लागलीं.

"पतिपत्नींनीं एकमेकाशीं मोकळेपणान वागू नये अस कुणीच म्हणणार नाहीं." गोपाळ पुढें बोलू लागला, "पण त्याच्या वागण्यात कृत्रिमपणा असण काहीं चागल नाहीं. शान्ताला माझ्याशीं मोकळेपणान वागणं आवडत, पण कृत्रिमपणाची छटा अलीकडे तिच्या वागण्यात जास्त पडू लागली आहे. माझ्याहि वागण्यात मी तिचीच हुबेहुब नक्कल करतों पुष्कळदा. पण फरक एवढाच कीं, शान्ताला ह्या कृत्रिमपणाची जाणीव नाहीं व मला आहे."

शान्ता डाव्या हातावर हनुवटी ठेवून खालीं पहात होती. मधुकर गंभीर बनला होता.

"ठाऊक असूनसुद्धा मी कृत्रिमपणान का वागतों अस तुम्हाला वाटेल. पण त्याच कारण एवढच, कीं मी जर तसा वागलों नाहीं तर शान्ताला वाटेल कीं, मी तिच्याशीं मोकळेपणान वागत नाहीं, अन् विनाकारण तिच आयुष्य दुःखात जायच ! मी ही गोष्ट यापूर्वी तिला सागायला गेलों असतों तर तिचा गैरसमजच झाला

असता, पण आज तू आला आहेस मधुकर, आणि एकदर परि-स्थितीहि अनुकूल आहे, म्हणून आजच्या संधीचा फायदा घ्यायच ठरवलय मीं. वाईट वाटू देऊ नकोस बर का, शान्ते ! कारण तुझा दोष फारसा नाहीं त्यात. दोष आहे अज्ञानाचा ! आणि खर ज्ञान आणि समज आल्याशिवाय तो दोष दूर होण सोप नाहीं. आता पहा, तुझ शिक्षण मध्येंच बद पडल तें मी फिरून चालू केल, सहा महिनेपर्यंत ठीक चालल होत, पण पुढ तूच सोडून दिलस, खरं ना ?"

शान्ता 'हो' म्हणाली, पण अगदीं हलक्या आवाजात.

"तुझी पूर्वीची चिकाटी कुठे गेली ? पुरुषाना पुष्कळदा विवाह झाल्यानतर अभ्यास करावा लागतो. अन् होतोहि. घरकाम मर्यादित असल्यानतर स्त्रियाना तसा का होऊ नये ? ज्ञान वाढविण्याचा प्रयत्न तू का करू नये ? तुला कोणती अडचण आहे ? मूल लहान-पणीं बोबडे शब्द बोलू लागल कीं आपल्याला त्याच कौतुक वाटत आणि त्याच्या बोबड्या बोलाची आपण तारीफ करतो. पण तें जसं जस वाढू लागेल, तस तस त्याच्या बोबड्या बोलाच सुदर, मोहक भाषेत रूपान्तर व्हायला नको का ? दहा वर्षाचा मुलगा बोबड बोलू लागला तर तुला आवडेल शान्ते ?"

"नाही." शान्ता खालीं पहातच म्हणाली. मधुकर आळीपाळीनें गोपाळकडे व शान्ताकडे पाहू लागला.

"नाहीं ना ? मग तुझ्याकडून सबध वर्षभर तोच विनोद, त्याच कोट्या, अगदीसुद्धा त्यात न भर पडता व्हायला लागल्या तर ते मला कस आवडेल ? तुझ्या ज्ञानात तुटपुज्या सासारिक अनुभवा-पेक्षा कितीशी भर पडली ? पुष्कळदा मी काय म्हणतो हेसुद्धा तुला नीटस कळत असेल कीं नाहीं कुणाला ठाऊक ! म्हणजे माझ्या

विचारात तुला भागीदार होता येत नाहीं. आणि असं जोंपर्यंत आहे तोपर्यंत खरं सुख मिळणं शक्य नाहीं, आणि मलाहि तुझ्या बोलण्या-पासून नेहमीं आनंद होईलच असं नाहीं।"

"पण गोपाळ! तुझ्याइतक्या ज्ञानाची तू शान्ताकडून अपेक्षा कशी करतोस?" मधुकरनें पृच्छा केली.

"तुला समजलं नाहीं माझं म्हणणं. मानसिक प्रगल्भता केवळ पुस्तकी शिक्षणावर अवलंबून आहे असं का तुला वाटतं? मला तर असं वाटतं कीं जगाच्या व्यवहाराकडे आणि दुसऱ्याच्या वागण्या-कडे उघड्या डोळ्यांनी पाहिल्याशिवाय खरं ज्ञान वाढत नाहीं. आत्मनिरीक्षण आणि इतराशीं तुलना ह्या दोन गोष्टींमुळेंच मनो-विकास होतो. आणि ह्या दोन गोष्टी नीटपणें करता येण्यासाठीं लागणारं आवश्यक पुस्तकी शिक्षण प्रत्येक स्त्री पुरुषानं घेतलंच पाहिजे. मी शिकवायला तयार असतांना व वेळ भरपूर असतांना शान्तानं कां शिकूं नये? ज्यांना शिक्षण मिळत नाहीं त्यांना तें मिळत नाहीं म्हणून हळहळ वाटते, आणि ज्यांना संधि मिळते त्यांना तिचा फायदा घ्यावासा वाटत नाहीं, इथे कोण काय करणार?"

"खरं ना हें, शान्ता?" मधुकर म्हणाला. पण शान्ता बोलणें शक्य नव्हतें.

"आणखीन् एक गंमत सांगतों तुला, मधुकर. हीच गोष्ट यापूर्वी अप्रत्यक्ष रीतीनें सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला. त्या वेळीं मला उत्तर काय मिळालं की—'मग कॉलेजातल्याच एखाद्या मुलीशीं लग्न कां नाहीं केलं?' म्हणून त्या प्रश्नाचं आतां मी उत्तर देणार आहें. तें एवढंच कीं, कॉलेजातल्या मुली जन्मतःच 'कॉलेजातल्या' असत नाहीत; त्यांनासुद्धां शिक्षणाच्या सर्व पायऱ्या चढाव्या लागतात.

शान्ते! त्याहि तुझ्यासारख्याच हाडामासाच्या मुली असतात. तुझ्याहि डोक्यात मेंदू आहेच कीं! त्याचा सदुपयोग करायची मात्र इच्छा नाहीं. आणि तू आपल्या हुषारीचा उपयोग तुला परिस्थिती मुळे न मिळवता आलेल ज्ञान आणि शिक्षण मिळवायचा यत्न करण्यात करशील अशीच मला बळकट आशा होती. कॉलेजात न जाता ज्ञान वाढत नाहीं आणि अक्कल येत नाही अशी माझी कल्पना असती तर तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच एखाद्या कॉलेजातल्या मुलीशीच लग्न केल असत, बर का! तें जाऊ द्या म्हणा! पण मुख्य मुद्दा एवढाच कीं, तुझ्याकडूनच तुझ्या प्रगतीचा मार्ग बद केला जातोय्."

"विचार करण्यासारखी गोष्ट आहे खरी!" मधुकर आपल्याशीच पुटपुटला.

गोपाळ पुढे बोलू लागला, "एकदा एक बारीकशी गोष्ट मी प्रसिद्धीला पाठवायच्या अगोदर शान्ताला वाचायला दिली, आणि दोन दिवसानतर तिच मत विचारल. तिचा अभिप्राय लिहून ठेवलाय् मी वहींत. फक्त तीन शब्दात असा अभिप्राय दिलान् की वाहवा! अन् तो अभिप्राय—'मी वाचली नाही!' इतक्या उत्तम अभिप्रायानतर मला ती गोष्ट प्रसिद्ध करायला हुरूप आला आणि ती गोष्ट प्रसिद्ध होऊन दोन महिने झाले. अजून तरी वालीन् की नाहीं कुणाला माहीत!"

"वाचलीस का ग, शान्ते?" मधुकरनें विचारले.

"नाही." शान्ता हलकेच खिन्नपणें म्हणाली.

"का नाहीं?"

"मीं वाचायला सागितली म्हणून!" गोपाळ म्हणाला. "तेहि जाऊ दे. पण दुसऱ्यानी माझ्याकडून गोष्टी वाचायला नेल्या—

विशेषतः एखाद्या मुलीनं नेल्या—तर मग असं होतं कीं ज्याचं त्यालाच ठाऊक ! याचा अर्थच मला कळत नाहीं मुळीं इतकंहि असून आतापर्यंत मी कांहींसुद्धा बोललों नाहीं. म्हटलं, आज ना उद्या येईल मार्गावर ! पण एखादी गोष्ट अंगवळणीं पडून सवय झाली, कीं ती बदलणं कठीण पडतं आणि शिकण्याचं वय गेलं कीं तेंहि जमत नाहीं जोपर्यंत आम्हाला एकमेकाच्या विचाराचे भागी-दार होतां येत नाही तोपर्यंत जवळ असूनहि परकेपणाच राहील. आणि वरून सुखी दिसलो तरी खरं सुख लाभणार नाहीं—निदान मला तरी नाहीं लाभणार खास !"

थोडा वेळ थांबून फिरून गोपाळ म्हणाला, "अर्थात् यांत शान्ताची फारशी चूक आहे असं म्हणणं नाहीं. कारण मी आतां पुढे मांडलेली बाजू अशा तऱ्हेनं कळलीच नसेल तिला आजपर्यंत. कळल्यानंतर ती सुधारण्याचा प्रयत्न करणार नाहीं असं मला वाटत नाही. माझी कैफियत संपली बरं का, मधुकर ! आतां शिक्षा फक्त करायची राहिली आहे. कारण गुन्हा—म्हणजे वेळीं अवेळीं चीड येईल असं वागणं—माझ्याकडून होतो हें मी अजूनहि कबूल करतों. मी जरा बाहेर बुधवारांत जाऊन येतों, तोंपर्यंत शिक्षा ठरवून टाक, शान्ते !"

गोपाळ उठला व त्यानें कपडे चढवायला आरंभ केला. शान्ताहि उठून गेली.

"मला वाटलं होतं राहशील थोडे दिवस तरी—कसली घाई लागलीय् तुझ्या पाठीमागे कुणाला ठाऊक." गोपाळ मधुकराला म्हणाला.

"शक्य असत तर नसतों का राहिलों ? परत येताना राहीन."

"शान्ताने परवानगी दिली तर जा, फारच घाई होते तुझी."

"निदान तू तरी अडथळा आणू नकोस."

"अगदींच निकडीच काम असल तरच जा."

"तसंच आहे रे !" मधुकर म्हणाला.

गोपाळ सायकल घेऊन रस्त्याला लागला.

मधुकर शान्ताला म्हणाला, "शान्ते ! मला साडेआठच्या मेलला जायचय् बर का !"

"म्हणजे ?" शान्ताला आश्चर्य वाटणें सहाजिकच होतें.

पण नाइलाजामुळेंच का होईना, शान्ताला मधुकरला परवानगी देणे भाग पडले.

गोपाळ बाहेर गेल्यानतर मधुकर शान्ताला म्हणाला,

"शान्ते ! खर ना गोपाळ म्हणाला तें ?"

शान्ता "हो" म्हणाली.

"नुसत 'हो' नको आहे मला. त्याच्या बोलण्यात काही चुकत असल तर साग मला. कारण मी जाण्यापूर्वी या गोष्टीचा निकाल लागला तर चागल. दोघाचहि हित आहे त्यात !"

"खरच, काय सागितल तें बरोबर आहे असच मला वाटत !" शान्तपणे शान्तानें उत्तर दिलें.

"होय ना ? मग सुधारण्याचा प्रयत्न करणार ना तू ?"

"तू फिरून केव्हा येणार आहेस ?"

"पधरा दिवसानतर."

"मग त्या वेळी प्रत्यक्षच पहा म्हणजे झाल. मी आज बोलून, दाखवीत नाही." शान्ताच्या चेहऱ्यावर गभीर हास्य झळकू लागले.

"किती शहाणी आहेस ग तू, शान्ते" मधुकर अगदीं मनापासून म्हणाला. शान्तालासुद्धा हृदयापासून निघालेल्या शब्दानीं लहानपणची आठवण झाली. तिला चटकन् हसू आलें.

"का हसतेस ?"

"आपण काहीं आता साऱ्या वाडीला पुरून उरणारीं मधु-शान्ता नाहींत. आता काहीं तू मला शहाणी म्हणत जाऊ नकोस. माझी अक्कल दिसली आज ! तुझी अजून दिसायची आहे पण लवकरच येईल ती वेळ ! खर ना ?"

"असेल !"

मधुकरला स्टेशनवर पोंचवून गोपाळ रात्रीं नवानतर घरीं आला. सर्व काम आटोपून शान्ता टेबलाकडे एक वही घेऊन बसली होती.

"काय चाललय, शान्ते ?"

"ह्या शब्दाचा अर्थ समजतो का पहातें. सागायचा ना तेवढा –"

"काय शब्द आहे ?"

"R E C O N C I L I A T I O N"

शान्तानें स्पेलिंग वाचून दाखविलें.

गोपाळनें त्या शब्दाचा अर्थ इतक्या चागल्या रीतीनें समजावून दिला कीं शान्ता तो कधींच विसरलीं नाहीं.

———

[ प्रकाशन-स्थल, 'यशवत' मार्च, १९३२ ]

## ६ विचारांचें पातक

संपत्तींत लोळणाऱ्याना काल्पनिक सुखदुःखाचा बागुलबोवा करून आपल्याबरोबर आणखी चार लोकानाही नाचविणें शक्य असतें—

त्याच्या उलट दारिद्र्याचें साहचर्य जन्मापासूनच लाभल्यामुळे सामान्य सुखदुःखानीं गरीबाच्या भावनाचा काटा हेलकावे खाऊ लागत नाहीं.

प्रश्न येतो तो मधल्या स्थितीतल्या लोकाच्या बाबतीत.

* * * *

शून्य दृष्टीनें तो खिडकीतून बाहेर पहात होता.

समोरच एका इमारतीचा पाया भरण्याचें काम चाललें होतें. उन्हातान्हात राबून काळीकुट्ट कातडी झालेले वडार मजूर दगड-माती इकडून तिकडे नेत होते. त्याच्या अर्धनग्न स्त्रिया डोक्यावरून चुना वाहाण्याचें काम करीत असताना मोठ्यानें गात होत्या. चुन्याच्या घाणीचे बैल मोठ्या कष्टानें, पण संसारात उन्हाळे पावसाळे

पाहिलेल्या अनुभवी माणसाच्या गभीरतेनें, ती अवजड शिळा आपल्यामागे ओढीत चालले होते.

'पोटाची खळगी भरण्यासाठीं काय ही घडपड ?' तो स्वतःशीच म्हणाला, 'आणि उद्याचा प्रश्न ? तोसुद्धा जगता कस येईल हाच ना ! कधीं तरी हा प्रश्न त्याच्या मागचा सुटेल का ?'

अस्तित्वासाठीं रक्ताचें पाणी करणाऱ्या त्या मजुराचा प्रश्न आणि त्याच्याच श्रमावर सुखात लोळत पडून केवळ काल्पनिक सुख-दुःखात आणि मानापमानात चूर असणाऱ्या 'डोकेबाज' लोकाचा प्रश्न यातला फरक त्याला त्यावेळीं तरी फारच जाणवत होता.

त्याचें तात्कालिक कारण म्हणजे त्याला थोड्याच वेळापूर्वी मिळालेलें पत्र. अजूनही तें त्याच्या हातात होतें. त्याच्याकडे पाहून तो एकवार खिन्नपणे हसला.

अस्वस्थपणें त्यानें घड्याळात पाहिलें. त्याच्या चेहऱ्यावरचा त्रस्तपणा क्षणोक्षणीं वाढू लागला होता.

—थोड्याच वेळात दारावर एक नाजुक थाप पडली.

"आत या" तो शातपणे म्हणाला.

एक तरुण विधवा सावकाशपणे पण थोडयाशा बावरलेल्या नजरेनेंच इकडे तिकडे पहात आत आली. ती सुदर होती, तशीच अभिमानी होती.

त्यानें हातानेच तिला खुर्चीवर बसायला सुचविलें.

"माझ पत्र मिळाल ?" तिनें खालीं पहात विचारले.

"हो" तो बाहेर पहातच म्हणाला.

"तुमच काय म्हणण आहे ?"

"I pity you, मला तुमची फार कीव येते."

"जरा सभ्यतेनें वागाल का ?" ती चमकून म्हणाली.

"मी तुम्हाला बोलावल होत का ?" त्यानें बेफिकिरपणे विचारलें.

"क्षमा करा मला! मी स्वतःला विसरलें होतें." ती नाइलाजानेंच म्हणाली. "सरलेच्या हितासाठीं मी माझा अपमान करून घ्यायला तयार आहे."

"पण माझा अपमान करायचा काय अधिकार तुम्हाला ?" त्यानें जरा तीव्रपणेंच विचारलें.

"मी तुमचा अपमान केला नाहीं." तिचा स्वर निश्चयी होता, पण तिच्या डोळ्याच्या कडा ओलसर झालेल्या दिसत होत्या.

'फिरून आपल पत्र वाचा!" तिरस्कारानेच त्याने ते पत्र तिच्या पुढ्यात टाकलें.

तिने ते पत्र उचलून घेतलें. ती वाचू लागताच तो म्हणाला, "मी सरलेच्या मानसिक अधःपाताला कारण होणार आहें असंच तुमच म्हणण! हा माझा मोठा सन्मान समजायचा नाहीं का ?"

"मी अजूनही तेच म्हणतें."

"सरलेलाच इथे आणा पाहू –"

"नको. आधीं माझ ऐका."

"बोला!" तिच्या तीव्र दृष्टीला त्यानें दृष्टी दिली.

"सरला अजून लहान आहे. विद्यार्थिदशेंत विवाहित आयुष्या विषयीं तिला विचार करायला लावण चागल का ? तुम्ही आपली जबाबदारी ओळखून वागत नाहीं!"

"मी माझी जबाबदारी पूर्णपणें ओळखतों. तुम्ही मात्र स्वतःची जबाबदारी ओळखली आहे असं वाटत नाही.'

"काय म्हटलत ?"

"माझ्याऐवजी तुम्हीच सरलेच अधिक अनहित करण्याचा संभव आहे."

"आमच आम्ही पाहून घेऊ" ती चिडून म्हणाली.

"मग इथे कशाला आलात्?"

"तुमच्यापासून तिचा बचाव करण्यासाठी."

"मग सरलेलाच इथे यायची बदी करा कीं!"

"तुमच्याशी बोलून काहींच उपयोग झाला नाही तर तसंच कराव लागेल" अधिकारी भाषेतच बोलली ती.

"मग मी आत्ताच सागून टाकतो कीं माझ्याशी बोलून काहीच उपयोग होणार नाहीं."

"जरा ऐकून घ्या ना!"

"क्षमा करा!" तो म्हणाला, "तुम्ही विचार केला आहे असं मला वाटत नाही. नाही तर असल भरमसाट बोलण तुम्हीं चालू ठेवलच नसत. अविचारानें तुम्ही स्वतः आपल्या आयुष्याचा नाश केलात् आणि सरलेचीही तीच स्थिति करणार आहात."

"मधुकर!" कापऱ्या आवाजात ती एकदम किंचाळलीच म्हणायला हरकत नाहीं.

"मला तुमच्याविषयीं फारशी दया किंवा आदर वाटण शक्य नाही." त्यानें कठोरपणा धारण केला.

"तुम्हाला हृदय आहे का?"

"मुळींच नाहीं."

स्वतःचें बावरलेलें मन ताब्यात आणून ती म्हणाली, "माझ्या-वर भलता आरोप करून काय मिळवणार तुम्ही?"

"आरोप असला तर तो खरा आहे. नुसत्या भावनेला बळी

पडण्याइतका मी भावनाप्रधान राहिलों नाहीं आता. माझी विचार-शक्ति भावनेवर ताबा चालविण्याइतकी प्रबल आहे."

तिनें दोन्ही हातानी आपलें डोकें घट्ट धरलें व डोळे मिटून घेतले.

थोड्या वेळानें ती म्हणाली, "इतर गोष्टी काय करायच्या आहेत आपल्याला ?"

"आयुष्याची असली विभागणी करायची मला संवय नाही. साऱ्या गोष्टीना महत्त्व आहे." त्यानें उत्तर दिले.

"कृपा करून आपण मुद्द्याकडे वळू या."

"तुम्हाला गतायुष्यातली आठवण आहे का ?" तिच्या बोलण्या-कडे दुर्लक्ष करून तो बोलू लागला.

"पुनः सागतें की दुसऱ्या गोष्टींचा खल करण्यासाठी मी इकडे आलेली नाहीं."

"माझ्या प्रश्नाच उत्तर दिलत तरच मी बोलेन तुमच्याशी."

तिनें एक दीर्घ नि.श्वास सोडला.

"विचारा प्रश्न" ती म्हणाली.

"चार वर्षांपूर्वीचा आपला स्नेह आठवतो का तुम्हाला ?"

"हो." तिनें मानेनेंच दर्शविलें.

"काय वाटत तुम्हाला त्याबद्दल ?"

"तुमच्या सहवासात काहीं दिवसपर्यंत मला आनद आणि एक प्रकारच समाधान वाटत होत हें मी कबूल करते."

"मग कोणता गुन्हा झाला माझ्या हातून, की त्यामुळें तुम्ही माझ्याशीं शत्रुत्वानें वागू लागलात ?"

"तुम्हीं माझ्या मैत्रीपासून भलतीच अपेक्षा केलीत."

"आणि म्हणून तुम्ही माझा द्वेष करू लागलात ?"

"मी तुमच्याकडे निराळया दृष्टीनें पहात होते."

"तुमचीच दृष्टी सदोष होती."

"काय ?" ती आश्चर्यानेच उद्गारली.

"आणि तेच मी तुम्हाला पटवून देणार आहे."

ती मात्र यावर काहीच बोलली नाही.

"लहानपणात नाचू बागडू नये, जिज्ञासेनें जगाकडे पाहू नये, आणि तारुण्यात जरठाची मनोवृत्ती अगीं आणावी अस तुमच म्हणण. खर ना ?"

ती घोटाळयात पडून सशयित दृष्टीनें त्याच्याकडे पाहू लागली.

' निसर्गाशीं द्रोह करण यातच आपला शहाणपणा आहे, त्यातच मनुष्याच श्रेष्ठत्व आहे अस वाटत तुम्हाला. तुमच्या दृष्टीला मी पापी दिसलों असेन कदाचित्, पण माझ्या दृष्टीनें तुम्ही मात्र भोंदू आणि दाभिक आहात."

"फारच धीटपणा चालवला आहे तुम्हीं !" तिचा स्वाभिमान जागृत होऊ लागला पुन्हा.

"त्याबद्दल मला मुळीच वाईट वाटत नाहीं. मला एवढच सागायच आहे कीं मी भलतीच अपेक्षा केली नाहीं. तुम्ही मात्र ती अपेक्षा भलतीच अस ठरवून अंध झालात ही तुमची चूक. कोणत्याही प्रकारानें मर्यादा न मोडता मी तुम्हाला विवाहाबद्दल विचारल यात माझी काय चूक झाली ?"

"मी तुम्हाला भावाप्रमाणें लेखीत होते."

"खोट बोलता तुम्ही."

"मुळींच नाही."

"मानलेलीं नातीं मी ओळखत नाहीं. बधु म्हणून माझा अपमान करू नका.'

"बधुत्वाच नात अपमानकारक आहे ?"

"होय ! तुमच्या बाबतीत तरी खासच आहे. तुमच्या दृष्टीने चुकणाऱ्या तुमच्या भावाशी तुम्ही द्वेषभावना अजूनसुद्धा धरली आहे हे तुम्हाला नाकबूल करता येणार नाही."

"मला तुमचा राग आला होता. मला वाटल कीं तुम्ही अगदीं मर्यादा सोडून वागलात."

"आणि त्या रागाच्या भरात माझा सूड घेण्याच्या इच्छेनें तुम्ही तुमच्या आणि दुसऱ्या एका जीवाच्या सुखाची राखरागोळी केलीत. अजूनसुद्धा तुमची सूडाची भावना—कारण काहींहि असे न—अगदी तीव्र आहे. तुम्ही त्यासाठीं तळमळत आहात. पण मी तुम्हाला सागून ठेवतों कीं तुमच्या प्रयत्नाना यश येणार नाहीं. तुमचा काल सपला आहे."

"मी तुमच्या सुखाच्या आड आलें ?"

"मी माझ्याविषयीं नाहीं बोलत. भलता आर्यस्त्रीपणा दाखवायला गेलात आणि वसंताच्या आयुष्याची माती केलीत."

"काय म्हटलत ?" विजेचा धक्का बसावा तशी तिची स्थिती झाली. दिवगत पतीचें नाव ऐकताच तिचा चेहरा दुःखानें एकदम काळवडून गेला.

सुवर्णाचें स्वरूप अग्नीच्या तापानें अधिकच उजळून येतें.

ती अभिमानी होती पण दुष्ट नव्हती. उतावळी होती पण कुत्सित नव्हती ही गोष्ट मधुकराला माहीत होती.

"अविचाराच्या पायी केवढी दुःखपरपरा आपण ओढवून

घेतों याची आपणाला त्यावेळीं कल्पना नसते. तुम्हाला मी एक कटु सत्य सांगणार आहें. पण सत्याच्या समोर उभ राहण्याची ताकद तुमच्या अंगी नाही अस मला अलीकडे वाटू लागल आहे. आणि तस असलं तर न बोलणच चांगल. नाहीं का ?"

हें तिच्या अभिमानाला आव्हानच होतें.

"काय बोलायच असेल तें बोला. मी ऐकायला तयार आहें." हृदयातले वादळ हृदयातच दडपून टाकण्याचा ती प्रयत्न करू लागली.

"परीक्षेपूर्वी अभ्यास का करायचा असतो ? आयुष्यात आपल्याला अनेक परीक्षा द्याव्या लागतात. त्याची वेळींच तयारी करायला नको का ? कुठल्याही गोष्टीबद्दल जबाबदारी घेण्यापूर्वी विचार करायला पाहिजे ना ?"

"हो." ती अस्फुटपणे म्हणाली.

"होय ना ? मग तुम्ही आपल्या लग्नाच्यावेळी कितीसा विचार केला होता ?"

"माझी काळजी वाहणारी आणि जबाबदारी घेणारी माणस होती आणि आहेतही."

"ह्याच भ्रमानें तुम्ही आपला नाश करून घेतलात."

"मुळींच नाहीं ! त्यानी केल तें अगदी विचार करून योग्य तेंच केल. पण माझ्या दुर्दैवाला ते काय करणार ?" तिचा स्वर कापरा होऊ लागला होता.

"दैवाला दोष देण्याचा तुम्हाला मुळीच अधिकार नाही. लग्नासारख्या नाजुक प्रश्नाच्या बाबतींत दुसऱ्यावर विसंबण हें तुमच्यासारख्या सुशिक्षिताच्या बाबतीत तरी घडता कामा नये.

तुमच्या पोटाला किती भूक आहे हें दुसऱ्यानी ठरविण्याइतक मूर्खपणाचं आहे तें. मी पुनः सागतों कीं केवळ विचार न केल्या-मुळे तुम्ही आपल्या आयुष्याची माती केलीत."

"गैरसमज झाला आहे तुमचा."

"कसा ?"

"आमच आयुष्य आनदात गेल. पण दुर्दैवानेच मला असे दिवस आणले." ती खाली पहात बोलत होती.

"तुम्ही मनापासून बोलत असला तर मला खरोखरच कींव येते तुमची. पण तुम्ही प्रतारणा चालविली असली तर मी तरी निषेधच करीन. तुमच आयुष्य मुळीच आनदात गेल नाहीं हें मी वाटेल तेव्हा दाखवून देईन. पण तुमच्या अंगात प्रामाणिकपणा कितीसा आहे तें पहायच आहे मला."

"खोटं बोलून काय मिळवायच आहे मला ?"

"खोटा मान ! घातकी शिष्टपणा."

तिनें चमकून त्याच्याकडे पाहिलें.

"वडील माणसाची खुशामत करायची, त्याच्यापुढें तोंडपुजेपणा करायचा आणि त्याच्याकडून तारीफ करून घ्यायची हा मोह पुष्क-ळाच्या नाशाला कारण झाला आहे. त्याच्या विरुद्ध वागायची ताकद नसते, आपल म्हणण त्याना पटवून देण्याइतकी चिकाटी नसते, आत्मविश्वास नसतो म्हणूनच you make a virtue of necessity. मी याला संभावित भ्याडपणा समजतों. तसला भ्याड-पणा तुम्ही दाखविलात आणि तेव्हापासून माझ्या मनातला तुमच्या-विषयींचा आदर पार नाहींसा झाला. तुमच्या त्या दांभिक वर्तनानें मला धक्का दिला आणि माझे डोळे चागलेच उघडले."

आणि तिच्या डोक्यात विचाराचे चक्र फिरू लागलें.

"तुमचं आयुष्य गेलं असेल कदाचित् आनंदात पण—पण—वसंताच..." त्यानें वाक्य पुरें केलें नाहीं.

ती चटकन् उभी राहिली आणि एखाद्या घाबरून गेलेल्या मुलीप्रमाणें त्याच्याकडे पाहू लागली.

त्याच्या दृष्टींतला तीव्रपणा वाढतच होता.

"संशयात ठेऊन माझा जीव घेऊ नका" ती काकुळतीला येउन म्हणाली.

"मरताना तरी दुसऱ्याचं कल्याण करायची बुद्धि होईल का ?"

"मधुकर !" केविलवाण्या स्वरात ती म्हणाली, " कृपा करून खरं काय तें सांगा मला."

"तुमच्या आणि वसंताच्या स्वभावात थोडतरी साम्य होतं का ? त्यानेंही विचार केला नाहीं. त्याला वाटलं तुम्ही सुशिक्षित, समंजस आहात. त्यानें आपलं सुख अगदी डोळे मिटून तुमच्या स्वधीन केलं. पण हृदयाची एकतानता हें वैवाहिक आयुष्यातलं सुखनिधान तुम्हाला लाभणं शक्यच नव्हतं. तुमच्या वडिलांनी त्याला पसंत केला आणि तुम्हीं त्याला माळ घातलीत. पण जुन्या रीतीच्या विवाहात ज्या मनोवृत्तीनें वधू देव समजून पतीचा स्वीकार करते, 'सर्वस्व' म्हणून त्याच्याकडे पाहू लागते ती वृत्ती तुमच्या अंगीं असणं शक्य होतं का ?"

खिन्नपणें त्याचें बोलणें ती ऐकून घेत होती.

"वैवाहिक जीवनात सुख मिळणं हें जरी बहुतांशीं नशीबावर अवलंबून असलं तरी त्या सुखाची लॉटरी-सोडत बनविली पाहिजे असा नियम नाहीं. तुम्हीं लग्न केलंत. कर्तव्य म्हणून आयुष्याची

नाटिका तुम्ही दोघानीही अखेरपर्यंत यशस्वी करून दाखविण्याचा यत्न केलात पण तुमच सुखही नाटकीच होत. खर सुख निदान वसताला मिळाल नाहीं—त्यासाठीं त्याचा भावनाप्रधान आत्मा अखेरपर्यंत तळमळत होता."

आणि त्या दिवगत आत्म्याची तळमळ नकळतच तिच्या नेत्रातून वाट काढू लागली.

"प्रेमाविषयींच्या विकृत कल्पना आपल्याला अजूनही काढून टाकता येऊ नयेत ना? प्रेम आधळ नसत, अगदीं डोळस असतं. पण आपल्याला मात्र त्याची जाणीव फारच उशीरा होते. पण इतक असूनही आपण आपला अनुभव आपल्याच बधुभगिनींनासुद्धा मोकळ्या मनानें सागायला तयार होत नाहीं. आणि दुष्टपणाची परिसीमा म्हणूनच कीं काय, कुणी कधीं त्याना वेळींच जागे करण्याचा प्रयत्न केला तर तेंसुद्धा आपल्याला सहन होत नाहीं. धोक्याचा तावडा दिवा दाखवणारालाच आपण चोर ठरवू पहातो."

पण अगदीं निःशब्दपणें ती ऐकून घेत होती.

"मला प्रामाणिकपणानें सागा कीं तुमच आयुष्य अगदी सुखात गेल?"

तिनें उत्तर दिलें नाहीं. मनाचा भार हलका करण्यासाठीं एक दीर्घ उसासा सोडला.

"वसताची माझी मैत्रीसुद्धा तुम्हाला पाहवत नव्हती, ही गोष्ट तुम्हाला कबूल करावीच लागेल. पण त्याने काही तुमच्या दीर्घद्वेषी स्वभावाचा परिणाम स्वतःवर होऊ दिला नाही." बोलता बोलता त्याचेही डोळे भरून येऊ लागले.

काहीं वेळानतर तोच पुनः बोलू लागला.

"तुमच्या दु:खावर डागण्या देण्यासाठीं मी बोलतो अस का वाटत तुम्हाला ? पण पुढचे अनर्थ तरी चुकविता आले तर चागल नाही का होणार ?"

पण ती मात्र बोलण्याच्या मन:स्थितींत नव्हती.

"मी तुम्हाला लग्नाविषयीं का विचारल अस वाटत ?"

"मला काय माहीत ?"

"त्याच कारण म्हणजे कांहीं काळ माझ मन तुमच्याकडे ओढ घेत होत. आणि मला वाटल कीं माझ प्रेम बसल आहे तुमच्यावर. पण मग मला कळून चुकल कीं तो तारुण्याचा पहिला उन्मादच होता."

"मग माझा नकार अयोग्य होता का ?"

"अर्थातच अयोग्य होता. चुकीच्या कारणानें दिलात तुम्ही नकार. कसा तो आताच सागितल मी तुम्हाला. म्हणजे आम्ही दोघही आपापल्या परीनें चुकतच होतों. पण खर सागू तुम्हाला ? माझ अजूनही प्रेम आहे तुमच्यावर."

"काय ?" ती दचकून म्हणाली. तिला सशय आला.

"प्रेम आहे पण प्रणयस्वरूपाच नाही. कुठल्याही सरळ मनाच्या व्यक्तीबद्दल मला प्रेम वाटत. सरलेवरही माझ प्रेम आहेच आणि म्हणूनच मी तिला विवाहाबद्दल विचार करायला शिकवल."

"तर मग माझा सशय खरा होता !" ती खोंचून म्हणाली.

"आधळ्याला सारेच आधळे. रूढीविरुद्ध उठलेली माणसच रूढीच्या गुलामगिरींत किती खोल रुतलेलीं असतात तें पहा. नुसत्या प्रेम ह्या शब्दानें बिचकून जाता तुम्ही, म्हणूनच फक्त प्रेमाचेच डोस अजूनहि आमचे साहित्यिक समाजाला पाजीत राहिले आहेत. थोडीशी दृष्टी बदला आता."

त्यानें हळूहळू गभीरपणा सोडून देण्याला आरभ केलेला पाहून तिलाही जरा बरे वाटले.

"अजूनही माझी खात्री नाहीं होत !" ती शेवटी म्हणाली.

"कशाबद्दल !"

"ते सुद्धा मला नाही सागता येत."

"म्हणजे बरच कळत म्हणायच तुम्हाला !"

पण ती जाण्यासाठी उठली.

इतक्यात जिन्यावर पावले वाजू लागली. दोघेही ऐकू लागलीं.

"सरलाच येते आहे वाटत. तुम्हीच सागा आता तिला काय सागायच ते." तो तिच्याकडे वळून म्हणाला.

तिने नकारार्थी मान हालवली.

त्याला बोलायला अवसर मिळण्यापूर्वीच दारावर थाप पडली.

"आत या" तो म्हणाला.

आनदी वृत्तीचें एक फुलपाखरू आत आले.

सरलेच्या मुद्रेवरचे आश्चर्य ओसरण्यापूर्वीच तो तिला म्हणाला, "सरू, आजपासून इथे येण्याची तुला सक्त मनाई आहे."

सरला आळीपाळीने दोघाच्याकडे पाहू लागली.

"का म्हणून ?" तिनें आपल्या थोरल्या बहिणीकडे सशयित दृष्टीनें पहात विचारले.

"तुझ्या बहिणीची आज्ञा आहे तशी."

"अस्स."

"खोट सागताहेत हे."

"म्हणजे माझ्यावर अधिक सत्ता कुणाची याबद्दल चर्चा चालली होती वाटत तुमची दोघाची ?"

"छट्! त्याहीपेक्षा अधिक गभीर विषयाचा खल चालला होता, समजलीस ?"

"म्हणजे माझं लग्न वगैरे... ?" सरलेनें आपल्या आनदी वृत्तीनें विषण्णतेचे काळे ढग क्षणार्धांत हाकून लावले होते.

पण मधुकरानें गभीरपणानेंच तिला उत्तर दिलें. "हें पहा! तो हिटलर डॅझिग घेऊन आता पोलडकडे वळला आहे...अर्थात् वेळ आणीबाणीची आहे!"

आणि बारिकसासुद्धा मेघ नाहीं राहिला आभाळात.

सहजच त्याची दृष्टी खिडकीबाहेरच्या त्या दृश्याकडे गेली.

डोक्यावरून चुना वाहून नेताना त्या वडार स्त्रिया मोठ्याने गात होत्या. चुन्याच्या घाणीवर तेच बैल कष्टानेच पण आयुष्यात उन्हाळे पावसाळे पाहिलेल्या माणसाच्या गभीरतेने ती अवजड शिळा आपल्यामागून ओढीत चालले होते.

एकामागून एक एक दगड त्या भावी इमारतीच्या पायात अदृश्य होत होता.

एकदम स्फूर्ति झाल्याप्रमाणें तो त्या दोघींच्याकडे वळून म्हणाला, "समाजाच्या सौख्यमदिराच्या पायातले दगड आहोंत आपण. आम्हाला भलता अभिमान धरून कस चालेल ?"

---

# ७ दुर्दैवी दैवत

भरलेला चहाचा पेला तसाच टेबलावर ठेवून विनीता बाहेर आली.

एका नव्या बोलपटची जाहिरात करणारी, विदूषक-वेषधारी अशी एक बेकाराची टोळी चित्रविचित्र अक्षरात लिहिलेले मोठाले बोर्ड घेऊन रस्त्याच्या कडेनें ओळीनें चालली होती. त्याचा म्होरक्या करण्याशीं तोंड लावून मोठ्यानें पुकारीत होता,

"दुर्दैवी दैवत !"

"दुर्दैवी दैवत ! !"

"दुर्दैवी दैवत ! ! !"

त्या टोळींतल्या प्रत्येक विदूषकाच्या छातीवर व पाठीवरही लिहिलें होतें "दुर्दैव दैवत—"

आणि हस्तपत्रिका उधळीत, नेहमींच्या थाटात ते लोक, लेडी जमशेटजी रस्त्यानें चालले होते.

खाडके चाळीच्या एका खुराडयातून विनीता तें दृश्य पहात होती.

जाहिरातवाले निघून गेल्यानतरही बराच वेळ ती शून्य दृष्टीनें कुठेतरी पहात तिथेंच उभी होती.

शेजारच्या बिऱ्हाडातल्या एका लहान मुलानें चागल्या चार पाच हस्तपत्रिका पैदा करून आणल्या होत्या त्यातली एक गोडीनेच तिने मागून घेतली व ती पुनः आपल्या खोलींत गेली.

पेला तसाच टेबलावर होता, पण चहा मात्र थड झाला होता.

"पाहिलत का?" आरामखुर्चीत कसलेसें पुस्तक वाचीत पडलेल्या पतिराजाना ती म्हणाली. "दुर्दैवी दैवत–"

"कुठल?" पुस्तकातून दृष्टी न काढता त्यानें विचारलें.

"सौ. वसुमती, बी.ए."

"तुझ्या माहितीची आहे?" निर्विकारपणें त्यानें सवाल केला.

"हो, ना!" एकाद्या अपघातात दगावलेल्या किंवा साथीच्या रोगाला बळी पडलेल्या आपल्या परिचयाच्या माणसाविषयीं बोल-ताना आपण जो स्वर वापरतो त्या स्वरात ती म्हणाली.

"हऽऽ!" त्यानें पुनः पुस्तकात तोंड खुपसलें आणि विनीता चहाच्या नादीं न लागता विषण्ण मनानेंच कॉटवर जाऊन पडली.

तिनें ती हस्तपत्रिका पुनः वाचायला आरभ केला.

सुविद्य, कुलीन आणि अभिनयपटु

सौ. वसुमती, बी. ए.

याची करुण भूमिका असलेलें

पुष्करचें दुर्दैवी दैवत—!

दुर्दैवी दैवत—!!

दुर्दैवी दैवत—!!!

तुफान गर्दीचा १० वा यशस्वी आठवडा—!— वगैरे... ..

'खरच दुर्दैवी—पण दैवत आहे का?' ती आपल्याशीच विचार करीत पडली होती.

आणि तिला दोन वर्षांपूर्वीचा तिचा स्वतःचाच वृत्तांत आठवू लागला—

केवळ आवड म्हणून ती गायला शिकली होती आणि वनिता-सेवा-समाजाच्या समेलनप्रसंगीं तिनें दाखविलेल्या गायन नैपुण्या-बद्दल साऱ्या वर्तमानपत्रांनी तिच्या छायाचित्रासह तिचें अकल्पित असें अभिनदन केलें होतें.

तिच्याइतकाच श्रीकांताला—तिच्या पतिराजानाही—हें अभि-नदनपर वृत्त वाचून आनंद झाला होता. "आहेसच तशी तू!" तिच्या गालावर एक चापट मारून ते तिला म्हणाले होते.

आणि ह्या समाधानांत तीं दोघेंही रंगून गेलीं असतानाच त्याच्या-कडे दोन सद्गृहस्थ श्रीकांताला भेटण्यासाठीं म्हणून आले—

ह्या उभयतानाही ते अपरिचित होते, परंतु ज्या समारंभानें विनीताला कीर्ति मिळवून दिली होती त्या समारंभाला उपस्थित असून तिच्या गायनाचे वेळीं ते अगदीं तल्लीनतेनें ऐकत होते हें मात्र विनीताला आठवलें.

शिष्टाचाराला धरून त्यानें त्याचें स्वागत केलें. आणि नंतर त्या दोघानीही आपापला परिचय करून दिला.

"हे श्री. मौलिकुमार कवि. आपण याच काव्य वाचलच असेल" एकानें दुसऱ्याचा परिचय करून दिला.

"अस्सं होय!" आदरानें त्याना श्रीकांतानें नमस्कार केला.

नंतर मौलिकुमार बोलू लागले:

"आणि हे ! बाकी ह्याचं नाव तर माझ्या पेक्षाही सुप्रसिद्धच झाल आहे आता– हे आपल्या उदयोन्मुख 'पुष्कर'चे यशस्वी दिग्दर्शक..."

"मास्टर प्रतोद कीं काय ?" आश्चर्ययुक्त आदरानें श्रीकातानें विचारलें.

मास्टर प्रतोद यानीं हसतच हस्तादोलनासाठीं हात पुढें करीत म्हटलें, "आपण श्रीकात सरोटे नाहीं का ?"

"glad to see you !" श्रीकातानें त्याच्याशी हस्तादोलन केले.

आणि आतल्या खोलींतून विनीता हा सर्व नमस्कार चमत्कार थोड्याशा विस्मयानेंच पहात होती.

दोन मोठ्या विभूति आपल्या घरीं अनपेक्षित आपणहून आल्या असताना कोणता मुबईकर चहा द्यायला चुकेल ?

आणि अर्थात् 'नको' म्हणून त्यानी चहा स्वीकारलाच.

पण फार वेळ सशयात न ठेवता कवि मौलिकुमार यानीच मुद्द्याची गोष्ट काढली.

"आम्ही कशासाठीं आलों हें तुम्हाला गूढ पडल असेल नाहीं ?" चहा घेताना विनीताबाईकडे पहातच ते बोलू लागले.

श्रीकातानें प्रश्नार्थी मान हलविली.

"मोठं चमत्कारिक दिसत खरं, पण गैरसमज होऊ नये यासाठी मध्यस्तापेक्षा प्रत्यक्ष आपण गाठ घेतलेली चागली म्हणून आम्हीच अलोंत्. आमच्या पुढल्या पिक्चरमध्यें चार दोन पद घ्यायचीं आहेत आम्हाला, आणि परवा ह्याच गाणं आम्ही प्रत्यक्ष ऐकलं नि आम्हाला वाटल कीं अगदीं पाहिजे तसा आवाज आणि म्हणण्याची धाटणी आहे याची. आम्ही चौकशी केली तुमच्याबद्दल आणि तुम्ही

काहीं सनातनी वृत्तीचे नाहींत, हें कळल म्हणूनच धाडस केल हो!" त्यानीं हसतच आपला उद्देश सागून टाकला.

हा प्रश्न ताबडतोब उत्तर देऊन टाकण्यासारखा नव्हता हें कवि मौलिकुमार याना कळत होतें. मास्टर प्रतोदही व्यवहारी होते

"अर्थात् तुम्हीं विचार करून आम्हाला कळवा. पण एवढच सागायच आहे कीं अगदीं मोकळेपणाने काय विचारायच सवरायच असल तर आम्हाला विचारा. हा आमचा इथला पत्ता. अजून दोनचार दिवस आहोत आम्ही मुबईत." कवि मौलिकुमारानी आपल्या पत्त्याचें कार्ड टेबलावर ठेवले आणि आपल्या सहकाऱ्यासह जाण्यासाठीं उठले.

"ठीक आहे !" श्रीकान्ताने त्याना हसतच निरोप दिला.

* * * *

ते गेल्यापासून त्या गोष्टीबद्दल तीं विचार करू लागलीं.

दोघेही सुशिक्षित, समजस होतीं. लोकमताच्या बागुलबुवाला भिऊन जाणारीं नव्हतीं. पण खरें म्हणजे त्या दृष्टीने त्यानी कधीं विचारच केला नव्हता.

पण आता त्याना विचार करणे भागच होते. 'नाहीं' म्हणण्या-साठींसुद्धा त्याना त्या गोष्टीबद्दल विचार करणें अवश्य होतें.

जगात योगायोग म्हणून काही तरी चीज आहे खासच. श्रीकाताचेंच पहा ना!

एवढा मोठा धडाडीचा माणूस. आपल्या अंगच्या हुषारीनें आणि चिकाटीनें त्यानें एक रगाचा कारखाना मुबईस सुरू केला होता. आणि त्याच कारखान्याच्या कमाईवर तो हिंदु कॉलनीत सुखासमाधानात राहू शकत होता. ह्याच चलतीच्या काळात त्याला

विनीतेनें जन्माचा जोडीदार म्हणून निवडलें होतें. तिचा गोड स्वभाव, हसरे टपोरे डोळे, सतारीसारखा स्वर– तिच्यात वैगुण्य काहींच नव्हतें आणि श्रीकाताला स्वर्ग पृथ्वीवरच आहे हें पटलें होते.

—पण कुठेतरी काही तरी चुकलें आणि त्याच्या धद्याने त्याला एकदम दगा दिला

कारखाना गेला, जवळ जी काही शिल्लक होती ती सपली आणि अर्थात् उद्याचा प्रश्न . ? पण उद्याच्या प्रश्नापेक्षाही 'काल परवा' वगैरेचा प्रश्न सोडविण्यातच त्याच्या मानी पण हळव्या मनाला कोण यातना होऊ लागल्या—

दूधवाला, दाणेवाला, धोबी,—हो घरभाडेसुद्धा चार महिन्याचें चढले होतें—आणि ह्या विवचनेंतच नवराबायकोचा जीव जोडीनें झुरणीस लागला होता.

पण ही झाली त्याची आतली स्थिति. बाहेरच्या जगाला कुठे त्याची दाद होती ! धद्यातल्या लोकाना थोडीफार कल्पना असली तरी इतराना वाटे "काय सुखी जोडप आहे !"

लोकाना आपल्या खऱ्या परिस्थितीची कल्पनाही येऊ नये या-साठीं दोघेही जिवापाड जपत. डोळ्यात अश्रु पण तोंडावर मात्र अगदी मोकळें हास्य अशा प्रकाराची विनीताला आता संवयच झाली होती. आणि अशाच मनःस्थितींत तिनें वनिता सेवा समाजाच्या समेलनात भाग घेऊन इच्छा नसताही आपलें गान नैपुण्य लोकाच्या नजरेस आणून दिलें होतें.

पण तो आनद–उन्माद तेवढ्यापुरताच. ती घरी आली तेव्हा श्रीकात विशेषच उदास झालेला दिसला तिला. तरी तिचा आवाज ऐकताच त्याने हसण्याचा प्रयत्न केला. पण––

ती मात्र निःशब्दपणें अश्रु ढाळीत उभी होती.

"काय झाल ?" त्याने हळुवारपणे तिला जवळ घेऊन विचारलें.

हुदका देतच तिने मानेने सांगितले 'काही नाही.'

पण ही प्रश्नोत्तरे अनवश्यक होती. 'काय झाल' हें दोघानाही माहीत होतें. पडत्या काळाच्या प्रखरतेत दोघेही होरपळत होती.

आणि अर्थात् दुसऱ्या दिवशी मौलिकुमाराच्या सूचनेचा विचार करताना 'नाही' म्हणायचे झाले तरी त्याआधी त्याना बराच विचार करणे भाग होते.

कीर्ति ! पण नुसतीच कीर्ति नव्हे, बरोबरच लक्ष्मीचीही प्राप्ति.

खरेच, मोह पाडण्यासारखीच होती ती गोष्ट.

दोघानीही खूप खूप विचार केला. सामान्यशी नोकरी धरली श्रीकाताने तर ? पण त्याच्या फ्लॅटचे भाडेच होते पन्नास रुपये ! आणि तेही चार महिन्याचे चढलेले अंगावर. इतर गोष्टी त्याशिवाय तोंड वासून होत्याच.

छे ! सुखासुखीच नव्हे, तर कष्टात दिवस काढूनसुद्धा नुसत्या मास्तरकीच्या किंवा कारकुनीच्या नोकरीने— आणि तीसुद्धा मिळाली पाहिजे ना ?— तो प्रश्न सुटण्यासारखा नव्हता.

बरे कुणाजवळ मागावे, कर्ज काढावे तर त्याही बाबतीत एक दोन ठिकाणीं आलेल्या अनुभवाने धसकाच बसला होता त्याना.

इतर भाकडकथाशीं करायचे काय ?

दुर्दैवाने प्राप्त झालेल्या असह्य परिस्थितीतून सुटका करून घेण्यासाठी—

"कलेसाठी सौ. विनीतादेवीचे सिनेमासृष्टीत पदार्पण !"

"सुशिक्षित महिलेचा अभिनंदनीय उपक्रम !' भडक शब्दात

वृत्तपत्रांनी ती बातमी दुसऱ्याच दिवशीं चोंहिकडे पसरून टाकिली.

कुणाचेंही एक छदामसुद्धा देणें न ठेवता लौकरच तें जोडपें सुखाच्या आशेने— कीर्तीच्या (आणि द्रव्याच्या) लालसेने— अगदीं सेकंड क्लासातून रवाना झाले.

× × ×

नुसत्या चार पदाच्यासाठीं एकदम चारशें रुपयावर विनीताला 'पुष्कर'नें घेतली नव्हती हें न कळण्याइतकी विनीता किंवा श्रीकांत हीं दोघेही मूर्ख नव्हतीं. आणि अर्थात् 'नायिके'च्या कामासाठीं तिची निवड झाली तेव्हा कुणालाच आश्चर्य वाटलें नाहीं.

कंपनीच्या सर्वच माणसांची त्यांच्याशीं अगदीं सभ्यपणाचीच वागणूक होती, आणि त्या दृष्टीनें असमाधानाला कांहींच जागा नव्हती.

श्रीकांतालाही कंपनीनें एका खात्यावर मुख्य म्हणून नेमून त्याला न्यूनगंड वाटू नये इतकी तजवीज धोरणानेंच करून ठेविली.

सर्व गोष्टींना धीटपणानें तोंड द्यायचें विनीतानें आधींच ठरवून टाकिलें होतें तरीसुद्धा तिला मधून मधून चमत्कारिक वाटल्या-शिवाय राहात नसे.

एक दिवस श्रीकांत एक वर्तमानपत्र घेऊन वाचीत बसला होता. पुष्करच्या 'विश्वामित्र' बोलपटाची जाहिरात होती त्यात.

"ह्या पहा तुमच्या नव्या पदव्या"— हसतच तो विनीताला म्हणाला.

"कसल्या पदव्या ?" तिनें मुरकत विचारलें.

"कवि मौलिकुमार यांची 'लाडकी' विनीता"

"दिग्दर्शक प्रतोद यांचें नवें फाईंड्—"

"पुष्करचे नवें नखरेल पार्सल्"

आणि श्रीकांत असा कांहीं चमत्कारिक रीतीनें हसला, कीं विनीताच त्याला लाडिकपणानें म्हणाली–

"खरच गडे ! तुम्हीच करा ना व्हिलनच काम ?" आणि पुनः तिनें एक गोड मुरका मारला.

"फारशी मुरकते आहेस आज ?" त्यानें वर पहात विचारलें.

"मेनका आहें मी आता !" तिनें एक गिरकी मारून म्हटलें.

"पण मी विश्वामित्र नाहीं ना !" त्यानें राजगुरूच्या भूमिकेंतील घोगरेपणा आपल्या स्वरात आणला होता.

"अं ऽ ह ! असं नाहीं बोलायच." तिनें आपलें बोट त्याच्या ओठावर ठेवून म्हटलें.

"तुझा हुकूम !" त्यानें तिला जवळ ओढीत म्हटलें, "तू आता फार मोठी– अगदीं विभूति– युद्धोत्तर महाराष्ट्रातल्या पहिल्या पाचांपैकीं एक झाली आहेस–" आणि पुन्हा तें वर्तमानपत्र पुढें धरून बोलू लागला "पहा ना !"

"कवि मौलिकुमार यांची 'लाडकी–'

"दिग्दर्शक प्रतोद यांचे नवें 'फाईड'

"पुष्करचें नवें नखरेल 'पार्सल'– यांच्या खऱ्या संस्कृतीची कल्पना यायला हे शब्दप्रयोग अगदीं पुरेसे आहेत !"

"म्हणजे ?" आश्चर्याचा तिसऱ्या डिग्रीचा अभिनय करीत तिने विचारले.

"म्हणजे काय असणार ? यांची प्रतिभा आणखी कोणकोणत्या नव्या चमत्कृतिपूर्ण चटकदार वगैरे... पदव्या निर्माण करते तें मला पहायच आहे."

"अहो पण जाहिरात आहे ती ? सगळ्याच ठिकाणीं कुठे ते पुरे पडणार ? लिहिल असेल कुणीं तरी..."

"हो ना ! त्यानी एकदा केव्हातरी फक्त आग लावून दिली आहे. ती विझवायला कसे पुरे पडणार हे ? खर आहे तुझ म्हणण ! पण गृहिणींची 'पार्सल' बनवून हे कोणत्या कलेच शिखर गाठणार आहेत कुणाला ठाऊक !"

विनीताने ओळखलें कीं श्रीकात आज वेगळ्याच मूड्स्मध्यें आहे. तिने एकदम पवित्रा बदलला–

' अस काय करता ? जग पाजी बनल म्हणून चागल्या लोकाच्या बद्दल सुद्धा संशय घ्यावा का ?"

"पण मीं कुठे संशय घेतला ? माझी खात्रीच झाली आहे मुळीं."

"खात्री ?"

"हो ! हे भले लोक महामूर्ख आहेत म्हणून ह्यानीं मर मर मराव. आपल्याच लोकाच्याकडून अर्धपोटी सुद्धा काम करून घ्यावी– महिनेच्या महिने पगार तुबवावे– एवढच काय पण आपल्याच समाजातल्या कुलाङ्गनाची 'पार्सल' बनवावी आणि—

"आणि काय ?"

"डिस्ट्रिब्यूटरचीं–प्रकाशकाची घर भरावींत ! तुमचे चित्रपट पन्नास आठवडे चालले तरी त्याचा खरा फायदा तिसराच खाणार !"

"खर आहे हें ?" तिने विचारले.

पण तिला ऑफ मूड्स् (off moods) करायची नव्हती त्याला. "चल, जाऊ दे तो विषय—किती राहिल आहे तुझ काम ?"

"थोड आहे आता–मला वाटत चार दोन शॉट्स असतील..."

"ठीक आहे. ह्या भूमिकेने साऱ्या हिंदुस्थानात–हो इटलीमध्यें

सुद्धा नात्र झाल पाहिजे... बर का! कलेसाठी कला आहे ही– आपल्याला काय करायचयू लोकाशीं!" आणि त्याने... कॅमेरा – स्टॉप! लाइट्स् ऑफ.

* * *

"हाऊ इज दॅट्?" दिग्दर्शकानी विचारले.

रेकॉर्डिंग व्हॅनमधून दोनदा घटा वाजली.

"ओ के. बस्स्, सुटलों बुवा." सिनारियोची वही फट्दिशीं बद करीत ते उद्गारले.

हसतच विनीता श्रीकाताकडे आली.

"कसं काय झाल काम?"

"हाऊ वॉज् दॅट्?" श्रीकातानें तो प्रश्न प्रतोदाच्याकडे पोंचविला.

"ओ के" ते म्हणाले.

तोच शेवटला शॉट होता. आणि नतर स्टुडिओत चित्रसमाप्तीच्या आनदाप्रीत्यर्थ लहानशी पार्टीच झाली.

सर्व काहीं होतें त्या पार्टींत. नाच आणि दारू, अर्थात् प्यायची. पिणारे प्यायले न पिणारे नुसतेच पहात राहिले.

कवि मौलिकुमार 'विनीतादेवी'च्याकडे वळून म्हणाले, "आता पुढल्या स्टोरीमध्यें असा स्कोप देतों तुम्हाला की पहात रहाल!"

पण त्याचा शब्द जरा जड येत असल्याकारणानें ती वेळ त्याच्याशी बोलण्याची नव्हती हें सर्वांनाच कळून चुकलें होते.

* * * *

तो चित्रपट म्हणजे 'बॉक्स् ऑफिस् हिट्' ठरला. मेनकेची भूमिका इतकी पसत पडली लोकाना कीं विनीताचे मेनकेच्या भूमिकेतले अर्धनम्र फोटो ही सुद्धा कपनीला उत्पन्नाची गोष्ट होऊन बसली.

आणि नाइलाज म्हणून विनीता कीर्तीच्या पायऱ्या भराभर चढून चालली होती.

तिला पहायला स्टेशनवर कोण गर्दी !

रस्त्यानें तिची मोटर जाऊं लागली कीं शाळाकॉलेजातल्या विद्यार्थ्यांच्या सायकलींची ओळच लागायची मोटारच्या मागे.

तिचा फोटो नाहीं असें वर्तमानपत्र दिसत नव्हतें.

फार काय, 'विनीताचा नवरा' म्हणून श्रीकाताकडेसुद्धा जेव्हा लोक टवकारून पाहू लागले तेव्हा त्याला कळून चुकलें कीं हजारों रुपये पब्लिसिटीवर खर्च करूनसुद्धा आपली यापेक्षा जास्त प्रसिद्धि होणें शक्य नाहीं.

पुष्करच्या ह्या प्रचड यशाबद्दल लोकाच्यातर्फे (कुठच्या?) कवि मौलिकुमार आणि पुष्करचे कलावत याचें स्वागत एका थिएटरमध्यें करण्यात आलें.

'विनीता–मौलिकुमार' याखेरीज दुसरे शब्दच ऐकू येत नव्हते.

अगदीं सनातनी वृत्तीच्या बुद्रुकानासुद्धा कलेबद्दल भडभडून आले आणि त्यानींही थिएटरवर गर्दी करून सोडली होती. रसिकाच्या-बद्दल तर बोलायलाच नको.

पुष्करच्या जाहिरातीच्या उत्तन्नाकडे दृष्टि ठेवून वर्तमानपत्रानी इतका भयंकर बोलबाला केला त्या स्वागतसमारभाचा कीं, श्रीकातच विनीताला म्हणाला,

"आता हिंदुस्थानात अवघ्या दोन व्यक्ति– पहिले गाधी आणि दुसरी तू..."

* * * *

विश्वामित्रानें अमर्याद लोकप्रियता सपादन केली होती. पण

बोलपटाला झालेल्या खर्चापेक्षा जास्त रक्कम पुष्करच्या पदरीं पडणें शक्यच नव्हते.

बोलपटाच्या भवितव्यतेचा सट्टा खेळणारी जी जात आहे तिला "डिस्ट्रिब्यूटर्स' अथवा 'प्रकाशक' असें सभ्य नाव रूढ आहे.

सागायचें एवढेंच कीं पुष्करच्या पदरी कीर्ति व प्रकाशकाच्या पदरी पैसा अशी वाटणी झाल्याकारणानें 'विश्वमित्रा'च्या लोकप्रियतेच्या उन्मादात राहणे पुष्करच्या चालकाना शक्यच नव्हतें आणि म्हणूनच मौलिकुमाराचें "दुर्दैवी दैवत !" हें त्याना शक्य तितक्या लौकर 'प्रोडयूस' करणे भाग होते.

कीर्तीचे गौरीशकर गाठलेल्या विनीताला पुष्करच्या पुढल्या बोलपटात मानाचें स्थान मिळणे क्रमप्राप्तच होते.

तिच्या पगाराचा आकडा चारशेंवरून चौदाशेवर गेला होता

श्रीकाताला दहा रुपये प्रमोशन पुढच्या महिन्यापासून मिळावयाचें होतें, तरी सध्या त्याला शभर मिळत होतेच.

कवि मौलिकुमारानी तिला भरपूर 'स्कोप' द्यायचें केव्हाच ठरवून टाकलें होतें.

खलनायक नायिकेला 'रॅव्हिश' करण्याच्या प्रयत्नात असता नायक येऊन तिची सुटका करतो असा कधी कुणाला माहितच नसलेला 'कॅच' आपल्या 'स्टोरी'मध्यें मौलिकुमारानी घातला होता. त्यासाठीं त्यानी आपल्या प्रचड प्रतिभेला दोन महिनेपर्यंत सतत सतावून सोडले होतें असेही त्यानीं एका 'आगाऊ' मुलाखतीत सागून टाकिलें होते.

अर्थात् हा बोलपट त्या वर्षाचे जागतिक 'प्राईझ्' उपटणार या बद्दल कुणालाच शका नव्हती.

आणि तालमी जोरात चालल्या होत्या.

तालमी पाहत असताना मौलिकुमार विचार करीत होते–

मेनकेच्या भूमिकेंत विनीताच्या रेखीव शरीराचा भाग सेन्सॉरच्या कात्रीची भीति न वाटावी इतकी काळजी घेऊन पुष्करने आपल्या प्रेक्षकाना उघडा करून दाखविला होताच. आणि त्याच्या कलेच्या कल्पनेवर विश्वास ठेवून तिनेंही त्या कलेची भक्तिभावाने सेवा केली होती.

प्रगतिप्रिय पुष्करला आता आणखी एक पाऊल पुढें जाणे तर अवश्यच होतें.

मौलिकुमाराच्यापुढें मोठा प्रश्न येऊन पडला होता– पण दोन तास डोकेफोड करूनही त्याना व्यवहार्य कल्पना न सुचल्यामुळे अगदीं उद्वेगामुळेंच पुढील शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडले, "काय भिकार संस्कृति आहे आपली? चारी बाजूनी कलेचा कोडमारा चालला आहे नुसता!!"

\+ + + +

चित्रपटाच्या 'शूटिंग'ला आरंभ होऊन बरेच दिवस झाले होते, आणि पुढच्या प्रवेशाच्या तालमी जोरात चालू होत्या.

आज त्या 'कॅच' सीनची तालीम व्हावयाची होती.

तो प्रवेश जरा जास्तच नाजुक असल्याकारणानें कवि मौलिकुमार, दिग्दर्शक प्रतोद, खल-नायकाची भूमिका करणारा नट आणि विनीता, एवढीच मंडळी त्या खोलीत होती.

पहिल्या पहिल्यानें श्रीकांत हजर राहात असे तालमींना. पण अलीकडे तो आपल्या कामात विशेष लक्ष घालू लागला होता.

आज तर तो कंपनीची 'बस्' घेऊन त्याच्या खात्यात लागणाऱ्या सामानाच्या खरेदीसाठीं दुपारीच निघून गेला होता.

मौलिकुमारानी सर्व प्रसग नीट समजावून दिला—

कुठें आवाज चढवायचा, कुठे स्वर पाडायचा, कुठून कसे व कुठे जावयाचें वगैरे गोष्टी तब्बल तासभर ते त्याना समजावून देत राहिले.

कानोसा घेत आसपास घुटमळत राहणारी मडळीसुद्धा कटाळून आपापल्या कामाना निघून गेली.

आणि मग—

प्रत्यक्ष अभिनयाच्या तालमीला आरभ झाला

विनीता–रूपी नायिका कोचावर आरामात पडून कसलेसें पुस्तक वाचीत होती—

खलनायक चोरट्या पावलानीं तिच्यामागे येऊन उभा राहिला. तिच्या दोन्ही खाद्यावर त्यानें आपले पाशवी शक्तीनें स्फुरणारे हात ठेविले.

तिनें त्याला तिरस्कारानेंच झिडकारले—त्याने तिला एकदम पकडून घट्ट . . .

"स्टॉप" मौलिकुमार म्हणाले. "हे पहा प्रतोद–खलनायकाच्या चेहऱ्यावर ह्याहीपेक्षा पॉलिश्ड व्हिलनी, अगदी सफाईदार expression पाहिजे. भलता दाडगटपणा आरभीच नको आहे मला."

ते उठले व त्यानी त्या सीनचें प्रात्यक्षिक करून दाखवायला आरभ केला.

"प्रतोद, तुम्ही दोन्ही व्यक्तींचे ॲगल्स ठरवा आणि एक फिगर दुसरीला कव्हर न करील एवढ पहा."

"तुम्ही पूर्वीप्रमाणें इथे पडून वाचनात गढून जा." मौलिकुमारानी विनीताला सांगितलें व ते खोलीच्या दुसऱ्या टोंकाला जाऊन प्रतोद व खलनायकाची भूमिका करणारा नट याना सूचना देऊ लागले.

"आता पहा माझ्याकडे .. रेंजच्या बाहेर जाऊ लागलो तर सूचना द्या मला बर का, प्रतोद."

एक एक पाऊल ते पुढे येऊ लागले.

उत्कृष्ट नटालाही लाजवील असा—अगदी एक नबरी अभिनय होता त्याचा—

विनीता पडून राहिली होती त्या कोचाच्या मागे ते येऊन उभे राहिले. त्याच्याच शब्दात सांगायचें म्हणजे अगदीं 'पॉलिश्ड व्हिलनी' त्याच्या दृष्टींतून ओसडत होती.

त्याचे अभिनयनैपुण्य पाहून दिग्दर्शक प्रतोद याचा अभिमानही क्षणभर लुप्तप्राय झाला.

मौलिकुमारानी भीषण असे 'सायलेंट' हास्य केले—

विनीता वाचनात गढून गेल्याचा अभिनय करीत होती– पण एकाएकी तिचे हृदय धडधडू लागले.

मौलिकुमारानी खाली वाकून तिच्या खांद्यावर हात टेकले– का कुणास ठाऊक पण एकदम तिच्या अंगावर काटा उभा राहिला.

वीज चमकावी तशी ती चटकन् उठून उभी राहिली– तिचा तिरस्काराचा अभिनिवेश पाहून मौलिकुमारहि क्षणभर स्तिमित झाले.

पण ते आपली भूमिका विसरले नव्हते–आणि सीन पुरा करण्यासाठीं ते पुढें सरकले– लागलीच त्यानी तिला एखाद्या विकारवश झालेल्या कामांधाच्या क्रूरतेनें आपल्याकडे खेचली—

पण दुसऱ्याच क्षणी ते कोचावर असे आदळले कीं त्या आघातानें तें कोच कडकन् मोडून पडलें.

विनीताची दृष्टी त्याच्यावर खिळून राहिली होती. पण तिचें Expression तिच्याच मागे उभे असलेले प्रतोद व खलनायक—याना दिसणें शक्य नव्हते.

*　　*　　*　　*

युद्धाच्या आघाडीवर शस्त्रास्त्राच्या ससारात रगून गेलेल्या सैनिकाना प्रत्यक्ष समरप्रसगीं झालेल्या बारीक सारीक जखमा त्यावेळीं कळत सुद्धा नाहीत असे म्हणतात.

कोणत्याही प्रकारच्या उन्मादात बेहोष झालेल्याची थोड्या फार प्रमाणात तशीच स्थिती असते.

पण सैनिक रणभूमीवरून शिबिरात परत आला किंवा मनुष्य उन्मादाच्या वातावरणातून बाहेर पडला म्हणजे मात्र त्याच क्षुल्लक गोष्टी इतके उग्र स्वरूप धारण करतात की प्रत्यक्ष मृत्यु समोर उभा असतानासुद्धा न डगमगणारा वीर—क्षणार्धात असहाय बनून जातो.

पूना-मेल विद्युत्‌वेगानें मुबईकडे धडकत चालली होती. गाडीत गर्दी म्हणण्यासारखी नव्हती. श्रीकात आणि विनीता तिसऱ्या वर्गातच समोरासमोरच्या बाकावर बसलीं होती.

श्रीकातानें कसलेसे वर्तमानपत्र वाचण्याचा प्रयत्न चालविला होता, अर्थात् विनीताला माहीत होतें कीं तो कसल्यातरी गूढ विचारात गढून गेला आहे. तिनें त्याच्याशीं बोलण्याचा प्रयत्नही केला नाही. अस्फुटसा निश्वास सोडून ती खिडकीबाहेर पाहू लागली.

झाडें, नाले, शेते— त्याच्या पलिकडे डोंगर— सगळे जगच

झपाट्यानें पाठीमागे पळत होतें. त्या दृश्यानें तिचें मनही भूत-काळाकडे वेगानें धाव घेऊ लागलें.

एकदा पाठीमागे पडलेली दृश्यें पुनः प्रवास केला तर दृष्टीला पडणे शक्य असतें. आणि दृश्य तेंच पण अनुभवाची गोडी मात्र वेगळी असेही होणे काहीं असभवनीय नसतें—

पण आयुष्याचा प्रवास पुनः कसा करता येणार ? एकदा गेलेला काळ परत येतो थोडाच ?

पुष्करमध्यें जाण्यासाठी तीं दोघे निघालीं त्यावेळच्या त्याच्या मनोवृत्तीत आणि आजच्या मन.स्थितीत थोडे तरी साम्य होतें का ?

कला, कनक, कीर्ति—किती उन्मादक त्रयी आहे ही ! त्याच्या पैकीं एकेकटेसुद्धा माणसाला धुद करून टाकायला पुरेसे असते.

पण ह्या तिहींचाही श्रीकांत-विनीताला एकदम वीट आल्यासारखे झालें होतें.

त्याचा कलेचा कैफ साफ उतरला होता.

त्या प्रसगाला अजून पुरते चोवीस तासही झाले नव्हते. पण त्या आठवणीनें सुद्धा तिला एकदम अस्वस्थ करून टाकिलें होतें.

खलनायकाचें काम करणाऱ्या नटानें तिच्या शरीराला स्पर्श—नुसता स्पर्श नव्हे— अगदी अत्याचारी हिसकाहिसक केली तरी तिला त्यात काहीं वाटले नाहीं.

'विश्वामित्रा'तील शृगारप्रसगाचे वेळी प्रथम तिला सकोच वाटला होता. क्षणभर शरीर शहारल्यासारखे झाले होतें. त्या अभिनव अनुभवानें तिच्या शरीरावर झालेला परिणाम बराच कालपर्यंत तिला जाणवला पण लौकरच ती त्याला सरावून गेली— आणि मग त्यात एक प्रकारचा यान्त्रिकपणा येऊन राहिला होता.

पण तिचे 'स्त्री'त्व मौलिकुमाराच्या कृतीकडे मात्र तिला त्या दृष्टीनें पाहू देईना. त्या प्रसंगी आपोआपच–विचार करण्यापूर्वीच–तिच्या हातून तीव्र प्रतिकार होऊन गेला होता. क्षणभर ती बेभान झाली होती.

तिच्या मनान उत्पन्न झालेली शंका–शंका कसली? खात्रीच–कोणत्याही प्रकारच्या तर्कशास्त्रानें दूर होणारी नव्हती.

आणि तेव्हापासून तिचे मन एकदम सर्वच गोष्टीकडे संशयित वृत्तीनें पाहू लागले.

कंपनींत आल्यापासून तिनें पुष्कळच गोष्टी ऐकल्या होत्या. पण त्यावर तिनें विश्वास ठेवण्याचे यापूर्वी नाकारले होतें.

आता मात्र ती त्या गोष्टी पुनः आठवून त्याबद्दल वेगळ्या दृष्टीनें विचार करू लागली.

प्रतापशाली पुष्करच्या जन्माचे आख्यान तिनें प्रथम ऐकलें तेंही विचित्र परिस्थितींतच. रंगपटात दोन 'फालतु स्टार्स' उर्फ 'एक्स्ट्राज्' एकमेकींशी बोलत होत्या. पण पलीकडच्या खोलींत विनीता होती याची जाणीवही नव्हती त्याना. त्याच्या संभाषणातून तिला एवढेंच कळून चुकलें कीं—

एक गब्बर 'शेट' एका चटकचांदणीवर फिदा झाला–

तिच्यामागें असलेल्या 'एजटा'नी शिकार हेरूनच ते आमिष सोडले होतें त्याच्याकडे. तिनें त्याला खूप झुलकावण्या दाखविल्या. आणि तो अधिकच पागल होत चालला होता.

आणि मग एकदाची ती चटकचांदणी त्याला लाभली.

दुसऱ्या दिवशींच 'पुष्कर'चा जन्म झाला.

'एजटा'ना भांडवल मिळालें– आणि भांडवलदाराला माशुक

मिळाले. एका चित्रपटात तिनें नायिकेचें काम केलें पण पुढे सेवा-निवृत्त होऊन आपल्या आश्रयदात्याच्या सेवेंतच ती गर्क झाली.

नतर 'पुष्कर'ला नवीन कलावताची जोड मिळून त्याची कीर्ति अधिकाधिक वृद्धिगत होऊ लागली.

धंदेवाईक स्त्रियाचा नाद सोडून कलेसाठीं 'बेटर स्टफ्'च्या शोधात पुष्करचे हुडके दलाल फिरू लागले. गुप्त पोलिसाच्यापेक्षा अधिक तीव्र दृष्टी होती त्याची. सावजाच्या परिस्थितीची छाया दिसली कीं गाठलीच त्यानीं शिकार–

विनीताला कळून चुकले की आपलीसुद्धा शिकारच केली जात होती– कलेसाठीं.

पण जोंपर्यंत कलेपेक्षा दुसरा काहीं हेतु नव्हता तोपर्यंत त्या धद्याच्या इतर बऱ्यावाईट उपागाच्याकडे डोळेझाक करण्याचे तिने ठरवून टाकिलें होतें.

एवढेंच काय, पण कलेची पुष्करच्या कलावतानीं केलेली विकृत व्याख्या स्वीकारून तिने अगदीं शब्दशः तन आणि मन कलेच्या कार्याला वाहिलें होतें.

पण प्रत्येक गोष्टीला मर्यादा आहेच–

त्या मर्यादेचें उल्लघन होण्याची वेळ आली तेव्हा मात्र तिने मौलिकुमारासह पुष्करची सारी कला लाथेच्या ठोकरीने दूर उडवून आपलें खरें स्वरूप दाखवून दिले.

कलेसाठीं शील सोडायला ती तयार नव्हती. अगदीं नटीच्या पेशाला सुद्धा– त्या अनेकविध मोहानीं भरलेल्या वातावरणात वावरूनही शील साभाळणें अतीशय कठीण असलें तरी अशक्य नाहीं असेच तिला वाटत होतें.

पण अगदीं अनपेक्षित बाजूनेंच तिच्या अब्रूवर, सभ्यपणाच्या नावाखालीं हल्ला झाला तेव्हा मात्र तिचा आत्मविश्वास किंचित् काळ तरी पार नाहींसा झाला.

अभिनय आणि विकाराच्या पोटीं उद्भवलेली नीच प्रकारची अत्याचारी वर्तणुक यातला फरक न कळण्याइतकी ती अप्रबुद्ध खासच नव्हती.

हा तिचा दुसरा बोलपट होता. तिच्या विनयकल्पनाच्या नाजुक कडा पहिल्या बोलपटात पार घासून नाहींशा झाल्या होत्या. तरीसुद्धा मौलिकुमाराच्या कृत्याला निष्पाप-सरळपणाची बाजू असेल असे तिचे मन तिला सागेना.

ती स्त्री होती आणि स्त्रीजातीला ज्या गोष्टी उपजतच कळतात त्याच्या बाबतीत तरी तिला दुसऱ्याकडून निर्णय अथवा आश्वासन नको होते.

अर्थात् ह्या सभ्य सभावित पाजीपणाचाच तिला मनस्वी सताप आला होता.

सिनेमा सृष्टीतल्या एका वर्षाच्या अनुभवाने तिला हेंही कळून चुकले होतें कीं त्या धद्यातील एकदर वातावरण जरी मोह प्रसगानी भरलेले असले तरी त्याचे कारण म्हणजे मुख्यतः त्यात आधीपासून शिरून राहिलेला पाजी लोकाचा भरणा हेंच होते. पण त्या तशा वातावरणातही काहीं चागलीं माणसे- खरोखर चागलीं माणसे- विद्वान् म्हणून नव्हे- तर शील ह्या शब्दाशीं ज्याचा चागला परिचय आहे अशा प्रकारचीं होतीं हेंहि तिला माहीत होतें. आणि तशा माणसाशी तिचा संबध आला असता तर आज आलेला त्या धद्याबद्दलचा किळस तिला कदाचित् आलाही नसता.

पण कालच्या प्रसंगानें तिच्या मनाला मोठा धक्काच बसल्यासारखें झालें होतें.

अनेक तऱ्हांनीं तिनें विचार करून पाहिला पण त्या प्रसंगाची आठवण झाली कीं आपोआपच तिचे ओठ त्वेषानें थरथरूं लागत. 'शुद्ध पाजीपणाच तो' तिचें मन आंतून बोले.

"मग काय ?" वर्तमानपत्राची घडी करून शांतपणानें श्रीकांतानें तिला विचारलें.

तिनें त्याच्याकडे रोखून पाहिलें. पण त्याच्या चेहऱ्यावर मात्र कोणताही मनोविकार तिला दिसला नाहीं.

"झाला विचार करून ?" तिनें तितक्याच निर्विकारपणें त्याला प्रतिप्रश्न केला. "आता पुढें ?"

त्यानें त्या वर्तमानपत्राची घडी पुनः उलगडली आणि तिच्यापुढें धरून म्हटलें, "ही पहा जाहिरात—××× कंपनीच्या पुढील सामाजिक बोलपटांत कामें करण्यासाठीं सुशिक्षित नटनटी पाहिजेत."

पण तें वर्तमानपत्र तिनें हिसकून घेतलें आणि खिडकींतून बाहेर फेकून दिलें.

* * *

खांडके चाळीमध्यें त्यांना रहायला येऊन आठदहा दिवस झाले होते. तेवढ्या मुदतींत सिनेमासृष्टींतला त्यांचा कैफ पार उतरून तीं दोघेंही अगदीं व्यवहारी माणसें बनलीं होतीं.

'विनीतादेवींनीं' पुष्कर सोडल्याची बातमी साऱ्या हिंदुस्थानभर केव्हांच पसरली होती. पण त्या गोष्टीला काय कारण झालें हें मात्र फारसें कुणाला कळलं नव्हतें.

वर्तमानपत्रांच्या बातमीदारांपासून, मुलाखतवाल्या लोकांकडून

किंवा इतर 'शिणेटोण'च्या लोकापासून विनाकारण त्रास होऊं नये म्हणून श्रीकातानें एका महिन्यासाठीं एक भीमसेनी भय्या चाळीच्या रखवालदाराच्या मदतीला दिला होता. ते दोघे मिळून आपलें काम अगदीं चोख रीतीनें बजावीत असल्याकारणाने विनीताला कसलीच काळजी उरली नव्हती.

पण एक दिवस 'पुष्कर' कपनीकडून विनीताच्या नावावर एक पत्र येऊन थडकलें. दिग्दर्शक प्रतोद हे स्वतः तिला भेटायला येणार असल्याचें त्यात लिहिले होतें.

प्रतोदाची भेट घ्यायला कुठलीच हरकत नव्हती. आणि ते आले तर त्याच्याशीं अगदीं, काहीच झाले नाहीं, अशा रीतीनें वागायचें असेच त्या उभयतानी ठरवून टाकले.

प्रतोद आले ते मात्र जरासे घाबरतच आले. रखवालीच्या भैय्याला पाहताच, आणि विशेषतः त्याने जेव्हा "कौन चाहिये" म्हणून दरडावून विचारले तेव्हा त्याना आपल्या स्टुडियोवरच्या रखवालदाराची आठवण झाली.

पण श्रीकाताने त्याना पुढें येऊन आपल्या बिऱ्हाडी नेले.

"का आठवण झाली गरीबाची?" विनीताने त्याना अगदीं मनमोकळेपणानें हसत विचारले.

"काय हो भलताच गैरसमज करून घेतलात तुम्हीं!" प्रतोद थोडेसे हसत म्हणाले.

"अस्स का! मला वाटल तुम्ही तरी माणसासारखे वागणार असाल. नाहीं तर..." ती जराशी रागानेंच बोलू लागली.

"इतक्या रागावलात तुम्ही?"

"तुमच्यावर नव्हे! तुमच्याबद्दल माझी मुळीच तक्रार नाहीं."

"पण मौलिकुमारा..."

"नाव नका काढू त्याच..." तिने तीव्र शब्दात बजावले.

"मग 'दुर्दैवी दैवता'च काय करायच ?" शेवटीं त्यानी खार्ल पद्दातच विचारले.

"नाद सोडा त्याचा आता... किंवा दुसरी एकादी कुलीन नटी गाठा. कठीण परिस्थितींत सापडलेलीं खूप तरुण जोडपी आहेत नाहीं तर वेळींच लग्न करायला चुकल्याकारणाने अगतिक झालेल्य विदुषी किंवा कॉलेजकुमारी पहा. त्याना सेन्सेशन पाहिजे असत आणि डोळे मिटून मौलिकुमाराच्यासह तुमच्या कलेचा, आणि कीर्तीचा स्वीकार करतील त्या .. घाबरता काय असे ?"

पण श्रीकातानेच तिला थाबविलें.

"अग पण आपण गृहस्थाश्रमी आहोत. चहा कर पाहू आधी !

* * * *

मनात येईल तेव्हा कीर्ति आणि सपत्ति त्याच्या पायाशी लोटागण घालीत आली असती.

पण मास्तरकीच्या नोकरींत आणि खाडके चाळीसारख्या जागे सुद्धा माणसाला जगता येतें कीं नाहीं ह्याचा प्रत्यक्ष अनुभव घ्याव याचें टरवून त्यानीं त्याच जागेत कायमची वस्ती करण्याचें ठरविले

प्रतोदानी विनीताच्या सल्ल्याप्रमाणे बेकार आणि बहकलेल्य समाजाचें मथन करून सौ. वसुमती, बी.ए. हें रत्न शोधून काढलें

विनीताच्या नतरचें तेंच कवि मौलिकुमाराचें 'दुर्दैवी दैवत' ! !

---